श्री

# शुकबाहत्तरी

प्रारंभः

हें बूक

लोकपरिज्ञानार्थ

मुंबईंत

बापू हरशेट देवळेकर यांणीं
आपले छापखान्यांत छापिलें

शाके १७८५ रु०

आवृत्ति

# प्रस्तावना

पूर्वी चंद्रकला नगरीचे ठाई विक्रमसेन राजा राज्य करीत असतां तेथें कोणी एक हरिदत्त नामें सावकार राहात होता; त्याची स्त्री श्रृंगारसुंदरी व पुत्र मदन व पुत्राची स्त्री प्रभावती ती सोमदत्त सावकाराची कन्या होती; मदन स्वस्त्रीचे ठाईं आसक्त होऊन व्यवहाराचा त्याग करिता जाहाला, त्याणें व्यवहारा विषयीं दक्षता धरावी यास्तव त्याचा मित्र त्रिविक्रम याणे विदग्धचूडामणी यानामें शुक व मालती नामें मैना या प्रमाणें दोन पक्षी मदनास आणून दिले; नंतर हरिदत्त सावकार याणे व्यवहार मनास आणावया विषयीं पुत्रास बहुत उपदेश केला; तेणेंकरून पुत्र क्रोधयुक्त होऊन त्याचे वचनाचा त्याग करिता जाहाला आणी अनादरही केला; हें पाहून एके दिवशीं विदग्धचूडामणी रावा मदनाप्रत बोलत आहे; हे मदना! माता, पिता, वृद्ध तुझे हिताचा तुला उपदेश करीत असतां त्यांची अवगणना करितोस हें तुला उचित नाहीं या पातकें करून देवशर्मा ब्राह्मण याची अवस्था कशी घडली ती कथा तुला सांगतो, श्रवण करावी.

## कथा १

पूर्वी पंचपूर नामें नगर होतें तेथें सप्तशर्मा नामें एक ब्राह्मण राहात होता त्याची स्त्री धर्मशीला आणि पुत्र देवशर्मा, तो पित्या पासून विद्याभ्यास करून गर्वास्तव माता पिता यांचा अनादर करिता जाहाला आणि देशांतरास निघून गेला, तेथे एका अरण्यांत सिद्ध स्थान पाहून तपश्चर्या करित होत्साता ब्रह्मतेज अधिक येऊं लागलें असें असतां एके दिवशीं स्नान करून संध्या वंदनास बसला आहे इतक्यांत वरून एक बगळी जात होती तिचा शौच आंगावर पडला ह्मणोन सक्रोध होऊन वरतें पाहिलें तों बगळी भस्म जाहाली, तेव्हां देवशर्मा यास आपण सिद्ध जाहालों असा गर्व जाहाला, नंतर भिक्षार्थ फिरत असतां नारायण नामा ब्राह्मण याचे गृहाप्रत गेला त्याची स्त्री पतिव्रता भर्त्यास भोजन घालीत होती, यास्तव किंचित् विलंब लागला; भोजन जाहाल्यानंतर भिक्षा घेऊन आली, तों देवशर्मा याणें क्रोधें करून तिजकडे पाहिलें; मग ती पतिव्रता ह्मणाली कीं, स्वामी! आपण क्रोधें करून मजकडे पाहातां परंतु मी ती बगळी नव्हे, स्वामिसेवे निमित्त विलंब जाहाला त्याचा मजकडे दोष नाहीं, हा धर्म आपणास विदि

त आहे; इतकें ऐकून ब्राह्मण विस्मय युक्त होऊन तिजला साष्टांग नमस्कार करून प्रार्थना केली कीं, माते! मजला ज्ञानोपदेश करावा, नंतर पतिव्रतेनें उत्तर केलें कीं, मजला स्वामिसेवेंत तत्पर असावें लागतें यास्तव अवकाश नाहीं, तर आपण काशी क्षेत्रीं जावें तेथें धर्मव्याध नामें एक मांस विक्रयी आहे तो ज्ञानोपदेश करील, तें ऐकोन ब्राह्मण काशीस गेला; आणि धर्मव्याध याचे घराचा शोध लाऊन त्याचे घरीं गेला आणि पाहिलें तों रक्तें करून हात भिजले आहेत आणि मांस विक्रय करितो हें पाहून दूर बसता जाहाला; नंतर धर्मव्याध याणें मांसविक्रय करून मातापितराची शुश्रूषा जाहाल्यानंतर ब्राह्मणास भोजन सामग्री दिली; भोजन केल्या उपरांत धर्मव्याध, ब्राह्मणास ह्मणाला कीं आपणास पतिव्रतेनें पाठविलें आहे हें मजला समजलें, त्यास मजला ज्ञान ह्मणजे काय हें ठाऊक नाहीं, माता पितरांची सेवा मात्र जाणतों, तेणें करून काहीं समजतें, परंतु मी चांडाळ यास्तव उपदेश करावया विषयीं अधिकार नाहीं; त्यास आपण माता पिता वृद्ध त्यांस घरीं टाकून सिद्ध व्हावया करितां बाहेर निघालां हें उचित केलें नाहीं तर आतां घरास जावें आणि उभयतांची सेवा करावी तेणें करून ज्ञान प्राप्त होईल अन्यथा ज्ञान प्राप्त न होतां दोष घडेल या अर्थी श्लोक.

जीवन्मृताश्चते ज्ञेयामृताःस्वर्गंनयात्यपि॥१॥

याचा भाव जे पुरुष पूजा करावयाविषयीं योग्य ते पिता इत्यादिक, त्यांतें पूजित, नाहींत, आणि जे अमान्य त्यातें मानिता हेत, ते पुरुष जीवंत असतां मृतासमान व मरणानंतर त्यांस स्वर्गही प्राप्त होत नाहीं; यास्तव थोरांस मानावें या सागीं तुह्मीं घरीं जावें; हें धर्मव्याधाचें वचन श्रवण करून त्याची पितृभक्ती पाहून घरीं आला आणि माता पितरांची सेवा करूं लागला तेणेंकरून ज्ञानही प्राप्त झालें; ही कथा सांगून शुक ह्मणाला कीं हे मदना. तूं वृद्धांचें वचन अमान्य करून विषयासक्त होऊन व्यवहार टांकिलास हें अनुचित आहे. आपली वंशवृत्ति, यास्तव व्यवहार करून द्रव्य संपादावें, वडिलाची सेवा करावी असें वचन ऐकून माता पितरांस साष्टांग नमस्कार करिता जाहाला; आपली स्त्री प्रभावती परम सुंदर आणि तारुण्यवती यास्तव विदग्धचूडामणी याचे स्वाधीन करून व्यवहारास्तव द्रव्य व नाव घेऊन द्वीपांतरास जाता जाहाला इकडे प्रभावतीस विरह अतिशय जाहाला त्याचें स्वरूप.

आहारोगरलायते प्रतिदिनंहारोऽपिभारायते
चंद्रश्चंडकरायते मृदुमतिर्वातोऽपिवज्रायते॥

हाहंतप्रियविप्रयोगसमयःसंहारकालायते॥२॥

याचा अर्थ-विरहिणी स्त्रियांस षड्रस पक्वान्न भोजन विषासारिखें भासते, नित्य नवीन पुष्पांचा हार तोही भार होतो; आणि सर्वांस आनंद कारक चंद्र अमृत किरण असतां, उग्र किरण जो सूर्य त्या समान भासतो; तसाच मंद गमनें करून वायू शरीरास स्पर्श करितां वज्रा सारिखा दुःसह लागतो; निज मंदिर अरण्यतुल्य दिसतें; आणि मलय-चंदनाची उटी, तीहि अग्नीचे कणासमान भासते या प्रकारें त्यांचें दुःख वर्णवत नाही यास्तव हाहंत हें कवी उच्चारून बोलत आहे कीं, प्रिय पुरुषाच्या प्रवासानें जो वियोग घडतो तो विरहिणीस प्रलय काला समान भासतो-या प्रकारें तिजला विरह प्राप्त झाला असें पाहून, सखीजनांहीं तिजला व्यभिचारा विषयीं उपदेश करून मोहित केली कीं, हे प्रभावती ! तूं आपले शरीराचें सार्थक करून घ्यावे, नाहीं तर यौवन व्यर्थ जाईल; असें सखी जनाचें वचन श्रवण करून गुणचंद नामें राजा याचे पुत्रासह वर्त्तमान रमावें, यास्तव नाना प्रकारें शृंगार करून चालली, तों मालती मैना इणें विचार न करितां प्रथम धिःकार करून निषेध केला कीं, तूं कुलीन स्त्री तुला हा विषय उचित नाहीं; नंतर प्रभावतीनें विरहाचे आवेशें करून त्या सालुंकीस मारावया करि

हा विस्मय जाह्वाला ह्मणोन त्या रात्रीस राहून दुसऱ्यादिवसीं निर्वेध मन करून कार्य सिद्धी व्हावी, यास्तव स्नान, दान व इष्ट देवतांस नमस्कार करून हातांत विडा घेऊन सखी जना सहवर्त्तमान मध्यरात्रीस बाहेर चालिली, ते समयीं शुक हांसोन बोलिला कीं, हे बंधुप्रिये! आज त्वां शृंगार केला आहेस त्यास माझा बंधु मदन आला कीं काय! ह्मणोन भेटायास जात्येस? किंवा अन्यत्र कोठे जात्येस? असें विचारिलें, तेव्हां प्रभावती हांसून लज्जेने अधोमुख होऊन बोलिली कीं, हे विदग्धचूडामणी शुका! मी परपुरुषा सहवर्त्तमान रमावें यास्तव जात्यें. हें ऐकून मालती नामें मैनाचा वृत्तांत मनांत आणून शुक बोलता जाहाला. हे प्रभावती सुखें करून जावें मी तुला निवारण करावयास समर्थ नाहीं परंतु तुजमध्ये लक्ष्मी सारिखें चातुर्य असेल तर जावें.

गच्छयास्यासि रंतु चेज्जारेण सह भामिनि ॥
यदि वेत्स्युत्तरं कर्त्तुं यथा लक्ष्मीः स्वभर्त्तरि ॥ ३॥

हें प्रभावतीनें श्रवण करून विचारिलें कीं ही काय अपूर्व गोष्ट आहे ती सांगावी. नंतर शुकानें उत्तर केलें कीं ही कथा मोठी आहे तूं किमर्थ विचारित्येस? आपले उद्योगास

आणिलें कीं, ही शिळेवर बसल्यानें इच्या शरीरास शितळ ता येऊन मदनाची शांती होईल असा विचार करून सांगी तलें कीं, ही शिळा पिंजऱ्यासमीप आहे तेथें बसावें, मग आ सन घेउन प्रभावती शिळेवर बसली तेव्हां शुक सांगतो कीं, पूर्वी चंद्रावती नगरीचे ठाई भीमक नामें राजा होता, त्याचा पुत्र मोहन, तो हरिदत्त सावकार याची स्त्री लक्ष्मी, तिजब रोबर संभोग करावयास इच्छित होता; तेव्हां सामोपवासिनी नामें कुंटिणीस बहुत द्रव्य देऊन लक्ष्मी साध्य करावयाचा उद्योग आरंभिला; तिणें लक्ष्मीचे घरास जाऊन हरिदत्त बाहेर गेल्यावर मधुर भाषणें करून त्याची स्त्री लक्ष्मी आ पल्या स्वाधीन केली; ती अति संतुष्ट होऊन सामोपवासि- नीस बोलती झाली कीं, जें तूं सांगशील तें मी करीन तेव्हां सामोपवासिनी ह्मणाली कीं, माझा संतोषास्तव आज मी सांगेन त्या पुरुषाबरोबर क्रीडा करावी; मग लक्ष्मी ह्मणा- ली कीं, आह्मी कुलीन स्त्रिया आह्मांस हें सर्वथा उचित नव्हे, तथापि वचन दिल्हें यास्तव एक वेळ परपुरुष आणा वा, नंतर सामोपवासिनीनें मोहना करितां रात्रीं लक्ष्मी स्वगृ हा प्रति आणिली तों त्या समयीं राजपुत्र मोहन आला नाहीं, तिजला काम अधिक झाला तेव्हां कुंटणीस सांगितलें कीं,

मार्गीजाऊन अविचारें करून तिचा भर्त्ता हरिदत्त घरींजात होता तो आणिला; आंत येतांच आपला भर्त्ता असें लक्ष्मीनें ओळखिलें इतकी कथा सांगोन प्रभावतीस शुक ह्मणाला कीं, लक्ष्मीनें आपला भर्त्ता असें जाणून, आपण व्यभिचारार्थ आलीहें परिस्फुट होऊं नदेतां स्व गृहास कशी गेली ? हें तूं अथवा ज्याणी तुजला परपुरुष संयोगाविषयीं उपदेश केला त्या सख्यानी सांगावें नंतर सर्वांनीं उत्तर केलें कीं, हें आह्मांस समजत नाहीं या कथेचा भाव तुह्मीं सांगावा तेव्हां शुकानें प्रभावती पासून, आज परपुरुषाकडे जाणार नाहीं, अशी शपथ घेऊन सांगता झाला. लक्ष्मीनें आपला भर्त्ता आला असें समजोन अकस्मात उठोन हरिदत्ताची शेंडी हातीं धरली आणि ह्मणाली कीं, अरे धूर्त्ता! मजजवळ नित्य बोलत असतोस, कीं, मजला तुजवांचून दुसरी स्त्री प्रियनाहीं याची परीक्षा पहावया करितां आजमी येथें येऊन संधान करून पाहिलें, असो परंतु हें उचित नाहीं; असें बोलोन अवलोकन करिती जाहाली तेव्हां हरिदत्तानें अपराध क्षमा करावा असें बोलोन आपली स्त्री लक्ष्मी तीचें समाधान करून स्वगृहाप्रत जाता जाहाला; आपल्यास चातुर्य नाहीं हें भय आणि लक्ष्मीचें चातुर्य श्रवण करून विस्म-

भावती त्या रात्रीस पर पुरुषार्थ नजातां शयन करिती झाली.

## कथा २

दुसरे दिवशीं शुकास आदर पूर्वक विचारून जात असतां शुक बोलतो.

यथेष्टं गच्छसुश्रोणि यदि यास्यसि सुंदरि ॥
यद्युत्तरसमर्थासि यशोदेवीव संकटे ॥ १ ॥

हा श्लोक ह्मणोन शुक बोलिला कीं, यशोदेवीचें वर्त्तमान जर मी तुला सांगेन तर तुझे गमनास विलंब होईल; तेणें करून तूं सक्रोध होऊन माझ्या प्राणास अपाय करशील यास्तव सांगत नाहीं; नंतर प्रभावती ह्मणाली कीं, तुझी कथा अति मनोहर लागत्ये, ती ऐकावयास योग्य आहे यास्तव सांगणें; अशी तिची आज्ञा जाहाली, नंतर शुक सांगतो पूर्वी नंदन नगरीत एक राजा राज्य करीत होता. त्याचा पुत्र राजेश्वर त्याची स्त्री शशिप्रभा, तिला पाहून धनसेनाचा पुत्र वीरसेन कामज्वरें करून पीडित होऊन भान नाहींसें होऊन सकळ विषयांचा त्याग करिता जाहाला; त्या समयीं त्याची माता यशोदेवी इणे असंतोषाचें कारण विचारिलें असतां वीरसेन पूर्ववृत्तांत सांगता झाला. नंतर माता यशोदवी ह्मणाली कीं, राजपत्नी दुर्लभ ती कशी प्राप्त होईल? नंतर वीरसेन

ह्मणाला कीं, ती शशिप्रभा प्राप्त न जाहली तर मरण होईल.
इतकी कथा सांगोन शुक बोलिला कीं, हे प्रभावती! राजस्त्री
शशिप्रभा ती परम दुर्लभ आणि तिचे प्राप्तीवांचून त्याचेंही
जीवन राहणें कठीण असें असतां ती प्राप्त होऊन वीरसेनाचा
संतोष कसा जाहला! ही युक्ती कशी? तूं परपुरुष समागम
करणार यास्तव चातुर्य करून मजला सांगावी; असें बोलि
ला; त्यानंतर प्रभावती ह्मणाली कीं, हें मजला समजत नाहीं,
तूंच सांगावें; तेव्हां तिजपासून, मी आज परपुरुषाकडे
जाणार नाहीं; असी शपथ घेववून शुक सांगतो. हे प्रभाव
ती! वीरसेन याची माता यशोदेवी इणे एके कुतरीला अन्नो
दकें करून आपले संन्निध राहावयास अभ्यास करविला,
आणि तिचे कंठाचे ठाईं रत्नें भूषणें घालून आपले बरो
बर तिजला घेऊन राजपुत्राची स्त्री शशिप्रभा तिचे समी
पजाती जाहली; नंतर शशिप्रभेनें विचारिलें कीं, ही कु-
तरी बरोबर आणावयाचें कारण काय? तेव्हां यशोदेवी
हास्य वदनें करून ह्मणाली कीं, कथा अपूर्व आहे परंतु
एकांतीं मी सांगेन असें बोलून एकांती शशिप्रभेस नेऊन
तिजप्रति बोलत आहे; हे सखे शशिप्रभे! पूर्वजन्मी तूं, मी,
आणि ही कुतरी या तिघीजणी बहिणी होतों; तेथें मी निः
शंक होऊन परपुरुषाचे मनोरथ पूर्ण केले, कुत्रीनें पुत्राबरो

बर संग केला, आणि तूं कोणाचें ही मनोधारण केलें नाहीं स तेणेंकरून तुजला या जन्मीं स्मरण नाहीं. मजला या जन्मीं अखंडित भोग आणि जाति स्मरण आहे; कुतरीस जाति स्मरण न राहून भोगाचे अंतीं विघ्नें बहुत आणि नीच योनी प्राप्त झाली; तुजला तर जाति स्मरण नाहीं; यास्तव मी तुजवर कृपा करावी ह्मणून मागील जन्मींची ही कुतरी तुजला भेटऊन पूर्ववृत्तांत सांगावा, या अर्थी ही कुतरी घेऊन माझें येणें झालें. तर तूं तरुण, सुंदर परपुरुष याचे मनोरथ पूर्ण करावे ह्मणजे तुजला दुसरे जन्मीं स्मरण इत्यादिक उत्तम फळ प्राप्त होईल; न केल्यास प्राप्त होणार नाहीं. हें यशोदेवीचें वचन श्रवण करून जन्मांतरींची कथा सत्य असेल असें मनांत मानून तिजला आलिंगन देऊन प्रार्थना करिती जाहली कीं, हे मम सखे! परिछिन्न असें जन्मांतरींचें वर्त्तमान आहे तर मजला परपुरुष आणून द्यावा; नंतर यशोदेवीनें आपले पुत्रास स्त्रीचा वेष देऊन ही आपली सून असें राजग्रहीं विदित करून शशिप्रभे बरोबर योजिती जाहाली. वीरसेन प्रतिदिवशीं स्त्री वेषें करून जाऊन तिचा उपभोग करूं लागला; अपूर्व वस्त्र तिजला आणून द्यावी, आपण ही घ्यावी या प्रमाणें व्यवहार चालता जाहाला हें शशिप्रभेचा भ्रतार शेखर याणें पाहून ही

रण केलें नाहीं, या युक्ती करून यशोदेवीनें आपले पुत्राचे मनोरथ पूर्ण केले. अशी कथा प्रभावतीस सांगून शुक ह्मणाला कीं, हे चातुर्य तूज असेल तर परपुरुषाचा समागम करावा, नाहीं तर व्यर्थ आपली विटंबना करून घ्यावी यांत काय फळ आहे? इतकी कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ३

तिसरे दिवशीं प्रभावती शुकास विच्यारून जात असतां शुकानें उत्तर केलें.

गच्छतत्राद्यशीघ्रंत्वंयत्रतेरमतेमनः॥ नृपवद्यदिजानासिपरित्राणंत्वमात्मनः॥१॥

याचा अर्थ- तुझें मन ज्या पुरुषाकडे लागलें आहे त्याकडेस लवकर जा. परंतु राजा सारिखें आपलें रक्षण तूं करावें असें तुझे ठाई चातुर्य असल्यास जा; हें काय आहे ह्मणोन प्रभावतीनें विचारिल्यानंतर शुक सांगतो आहे. पूर्वी विशाल नगरीचे ठाईं सुदर्शन नामें राजा राज्य करीत असतां तेथें विमळ नामें वाणी राहात असे, त्यास दोन स्त्रिया परम सुंदर असत, त्यांचा एका धूर्त्तानें लोभ धरून श्रीअंबिकेची आराधना केली, आणि देवी प्रसन्न जाहली तेवेळीं,

सांगीतला तों देवी पासून आपण, विमल वाणी या समान हो ना जाहाला; नंतर कोणे ऐके दिवशीं विमल वाणी देशांतरास गेला ती संधी राखून आपण त्याचे घरीं जाऊन विमला प्रमाणें स्वामित्व करूं लागला. तेव्हां घरांतील मनुष्यानीं विचारिलें कीं, तुह्मी प्रवासास जाण्याकरितां निघून गेलां, आणि कोणते कारणास्तव परतोन आलां ? त्यांस उत्तर केलें कीं, मार्गांत उपद्रव बहुत या करितां जाणें घडलें नाहीं असें सांगून स्वस्थ राहिला, दान धर्म बहुत लोकांस केला व सेवकांस द्रव्य अलंकारादिक देऊन संतुष्ट केले, आणि विमलाच्या स्त्रियाचा उपभोग करूं लागला; नंतर लोक ह्मणूं लागले कीं, विमल याणें शरीर अनित्य, क्षण भंगुर असें जाणून धर्मादिकें करून द्रव्याचा यथार्थ व्यय केला; कांहीं दिवशीं सत्य विमल घरी आला तों द्वारपाळ यांस धूर्त्त विमल याणें सांगीतलें होतें कीं, माझे आज्ञे वाचून वाड्यांत कोणास येऊं नदेणें. त्याजवरून त्याणीं निषेध केला; तेव्हां बाहेर उभा राहून फुकार करून श्वासोश्वास पूर्वक ह्मणूं लागला कीं, कोणी धूर्त्तानें वंचना केली. असे ऐकून लोक कौतूक पाहावयास मिळाले, नंतर सुदर्शन राजा जवळ वाणी जाऊन हाहाःकार करूं लागला कीं, आ-

[illegible]
धूर्त विमलास पाहावया करितां, दूत पाठविले, त्यांस धूर्त विमलानें द्रव्य देऊन वश केलें; तेव्हां त्याणी जाऊन राजास सांगीतलें कीं, विमलवाणी तो घरास आहे हा कोण धूर्त आला आहे राजानीं पाहावें, मग राजानें त्या धूर्त्तास घराहून बोलाऊन आणिलें आणि दोघांस एकत्र बसविलें तों सत्य कोण व धूर्त्त कोण हा निश्चय नजाहाला; मग राजा साशंकित जाहाला; कारण मी प्रभू याणें दुष्टांचा निग्रह आणि साधूंचें वंदन, दरिद्री यांचें पालन करावें तणें करून स्वर्गप्राप्तीआ

प्रजापीडनसंतापसमुद्भूतो हुताशनः॥ राज्ञो हे
कुलश्रियं प्राणान्दग्ध्वैव विनिवर्त्तते॥ २॥

याचा अर्थ – राजानें प्रजेस उपद्रव दिला असतां त्याचे संतापापासून उत्पन्न जाहाला जो अग्नी तो राजाचें कुळ, लक्ष्मी आणि प्राण यांचें भस्म करून शांत होतो. यास्तव प्रभूनें प्रजेचें पालन पुत्रा प्रमाणें करावें; न्याय यथार्थ करावा असा विच्यार करून राजानें एकांतीं बसून उपाय योजिला तो असा कीं, विमलाचे स्त्रियांस पृथक् पृथक् नेऊन त्यांचे विवाहापासून कथा विच्यारिली, नंतर सत्य व धूर्त्त विमल या उभयतांस पृथक् पृथक् विच्यारिलें ते समयीं खरा विमलवाणी याणें स्त्रियानीं सांगीतल्या अन्वयें यथास्थित सां

तर राजानें त्या धूर्त्तांचें शासन करून, गर्दभावर बसवून राज्या बाहेर काढून दिल्हा; सत्य विमलवाणी होता त्यास स्त्रिया, घर व द्रव्य देऊन सर्वलोक संतुष्ट केले तेव्हां लोकांत राजा परम बुद्धिमान् विचारवंत न्याय यथास्थित करितो अशी कीर्त्ती जाहली; ही कथा सांगोन शुक ह्मणाला की, या प्रमाणें विच्यार व बुद्धी तुजला असेल तर परपुरुषाचे घरीं जावें हें शुकाचें वचन ऐकून प्रभावती स्वगृहींच शयन करिती जाहाली.

## कथा ४

दुसरे दिवशीं प्रभावती शुकास विच्यारून जात असतां शुक बोलिला कीं, माझी अवज्ञा करून जावें हें तुला उचित नाहीं; बालकाचें वचन हितकारक असल्यास घ्यावें; वृद्धाचें वचन तर कदापि अमान्य न करावें, केल्यास अनर्थ प्राप्त होतो या विषयीं कथा सांगावयाकरितां हा श्लोक सांगत आहे.

कृतावज्ञः परं देवि वृद्धवाक्यपराङ्मुखः॥ पतितो ब्राह्मणः कृच्छ्रे विषकन्याविवाहने॥ १॥

ही कथा कशी आहे ह्मणून प्रभावतीनें विच्यारिलें असतां शुक बोलतो. पूर्वीं सोमप्रभानगरीचे ठाईं सोमशर्मा ब्राह्मण राहात होता त्याची विष नामें करून एक कन्या होती, तिचें नाम ऐकून कोणी वर विवाहार्थ येईना, ते समयीं

आपले कन्येस वर पाहावा ह्मणून सोम शर्मा कन्येस घेऊन जनस्थानीं गेला, तेथें गोविंदनामें ब्राह्मण मूर्ख व निर्धन रा हात होता त्यास आपली विष नाम्नी कन्या द्यावयाचा निश्च य करिता जाहाला त्या समयीं स्नेह्संबंधी, वृद्ध याहीं गोविं दास निवारिलें असतां त्याणें अवगणना करून तिचें रूप लावण्य पाहून विवाह करिता जाहाला, नंतर कोणे एके स- मयीं विषकन्येनें आपले भर्त्यास विचारिलें कीं, मजला पि त्याच्या घराहून येऊन बहुत दिवस जाहाले, यास्तव तूं मज- ला पित्याचे घरीं नेऊन पोचवावें, अन्यथा स्त्रीचे जाणे एका एकी होणार नाहीं. नंतर गोविंद याणें एक भाड्याचा रथ क रून विष कन्येस घेऊन चालिला तों मार्गांत एक विष्णुशर्मा नामें ब्राह्मण तरुण, शूर, व वक्ता असा अकस्मात भेटला त्याची आणि विषकन्येची मार्गांतील संगतीच्या योगानें अतिशय प्रीति जाहाली, तेव्हां विष्णुशर्मा याणें उभयतांस पांच रुपाया व पांच पुंषें दिलीं, तेणें करून विश्वास हो ऊन त्याणीं त्यास आपले रथावर बसविला आणि गोविंदश र्मा खालीउतरून पायानें चालत असतां कांहीं अंतर पडून मागें राहिला त्यासमयांत विष्णुशर्मा याणें आपलें नाव, गोत्र व वंशपरंपरा विषकन्येस सांगितली आणि तिज पासून ही तिची वंशपरंपरा विच्यारून घेतली नी आपल्यास माहित

अरे चोरा रथावर किमर्थ बसतोस ? ह्मणून विष्णुशर्मा याणें निषेध केला; मग उभयतांचा कलह होऊन परस्परें भांडूं लागले, विषकन्येनें विष्णु शर्मा याचा पक्ष धरिला, यास्तव गोविंदशर्मा मूर्ख यास पराजित करून विषकन्येस घेऊन घरास चालिला, तों गोविंद शर्मा पाठीस लागून जात असतां मार्गांत एके गावीं बोभाट करिता जाहला कीं, हा माझी स्त्री घेऊन चालिला आहे, तर माझें रक्षण करावें. नंतर ग्रामाधिकारी याणी विषकन्ये सहवर्त्तमान विष्णुशर्मा धरून आणिला आणि त्यास विचारिलें असतां त्याणें उत्तर केलें कीं, माझी विवाहित स्त्री मी घेऊन येत असतां हा गोविंद शर्मा मार्गांत बलात्कार करून घेऊन जातो, हें ऐकून गोविंदशर्मा यास विच्यारिलें तेव्हां त्याणेंही हेंच सांगितलें; उभयतांचें वचन एक सारिखेंच श्रवण करून ग्रामाधिकारी याणीं उभयतां ब्राह्मणास वेग वेगळें विच्यारिलें कीं इचे विवाहास दिवस किती जाहले व इजला घराहून घेऊन कोणते समयीं निघालास ? आणि वाटेनें दुसरा कोठे भेटला ? हें कसें, तेव्हां प्रथम गोविंदशर्मा याणें यथास्थित वर्त्तमान सांगितलें, तें व विषकन्येचें एक सारिखें मिळालें विष्णु शर्मा यास उत्तर न होतां कुंठीत जाहाला ह्मणून ग्रामाधिकारी याणी

विष्णुशर्म्याची विटंबना शासन पूर्वक करून गांवा बाहेर घालविला; विषकन्या गोविंदशर्मा याचे स्वाधीन केली; आणि त्यास सांगीतले कीं, अरे मूर्खा ही व्यभिचारिणी स्त्री इच्या योगें करून इहलोकीं अपकीर्त्ती व परलोकीं नरक प्राप्ती होईल, यास्तव दुसरा विवाह करावा. मग गोविंदशर्मा याणें तिजला तिचा पित्याचे स्वाधीन करून आपण स्वगृहास जाता जाहाला. ही कथा सांगोन शुक बोलिला कीं, मान्य पुरुषाचें वचन न ऐकिल्यास असें फळ प्राप्त होतें.

पुरुषोयः करोत्येवमवज्ञांवृद्ध शिक्षितः॥स
पराभवमाप्नोतिगोविंदोब्राह्मणोयथा॥ २॥

याचा अर्थ– वृद्धानीं शिक्षा केली असतां, त्या कथेचे वर्त्तमाना प्रमाणें जो पुरुष शिक्षा मानीत नाहीं तो गोविंदशर्मा याचे परी पराभव पावतो. तस्मात् वडिलांचे वचनाची अमर्यादा कदापि नकरावी. इतकें श्रवण करून प्रभावती स्वगृहीं शयन करिती जाहली.

## कथा ५

दुसरे दिवशीं प्रभावती, शुकास विच्यारून जात असतां शुक बोलतो आहे.

गच्छदेविविजानासिकर्त्तुंचेत्स्वयमुत्तरम्॥
सभामध्येयथासाहिविषमेबालपंडितः॥१॥

वरून शुक सांगता जाहला; पूर्वी उज्जनी नगरीचे ठाईं विक्रम राजा याची स्त्री कमलिका नामें होती; ती एके समयीं राजा बरोबर भोजन करीत असतां, विक्रमानें प्रीतिस्तव शिजलेले मत्स्य त्यास दिल्हे, कामालिकेनें उत्तर केलें कीं, स्वामी! मी परपुरुषाचे शरीरास स्पर्श कसा करावा? हे ऐकून शिजलेले मत्स्य प्राण नसतां हास्य करिते झाले. भोजनोत्तर विक्रम राजा याणें, मत्स्यानें हास्य करावयाचें कारण मंत्री, ज्योतिषी, चतुर पुरुष यांस विच्यारिलें, तें कोणासही समजेना; तेव्हा आपला उपाध्याय यांस सांगीतलें कीं, तुह्मी कुळगुरू यास्तव मत्स्य हसावयाचें कारण सांगावें, नाहींतर नगरा बाहेर घालवीन; हें वचन श्रवण करून पांचा दिवसानीं सांगतों असा निश्चय करून उपाध्याय चिंतातुर होऊन घरीं येता जाहला. त्याची कन्या बालपंडिता या नामें होती, तिणें पित्यास चिंतातुर पाहून विच्यारिलें कीं, आज तुमचें चित्त उद्विग्न व्हावयाचें कारण काय? तें सांगावें, विपत्ती काळीं चतुरानीं दीनता नदाखवावी या अर्थी श्लोक.

उदयेसविता रक्तो रक्तश्चास्तमयेतथा॥ संपत्तौच विपत्तौच महतामेकरूपता॥ २॥ धैर्यंन जत्याद्विपदि द्विवारंनवदेत्तथा॥ सत्यंवदे

...सताम् ॥ ३ ॥

याचा अर्थ–जसा उदय काळीं आणि अस्तकाळीं रवी जो तो आरक्त रूप धारण करितो, तसे महा सूज्ञ जेते संपत्ती काळीं व विपत्ति काळीं समान रूप धारण करितात. दुसरे श्लोकाचा अर्थ आपत्ति काळीं धैर्य सोडूनये आणि कोणास वचन दिल्यानंतर वचनास मागें फिरूनये लोकांजवळ सत्यच भाषण करावें. हें कठीण व्रत शिष्टांस खड्ग धारे समान. कोणी उपदेशिलें तें स्वाभाविक त्यास प्राप्त व्हावें. हा अर्थ ब्राह्मणानें ध्यानांत आणून राज गृहींचा वृत्तांत्त कन्येस सांगून ह्मणाला कीं, हा अर्थ न सांगीतल्यास राजा नगरा बाहेर घालवील. आज पर्यंत आह्मीं सेवा केली तो स्नेह व्यर्थ जाऊन हें संकट प्राप्त झालें. तस्मात राजाचा स्नेह सर्व काळ समान असत नाहीं.

न सौहृदं न विश्वासो न स्नेहो न च बंधुषु ॥ के
नापि च न मंतव्यं कुतो राज्ञा महात्मना ॥ ४ ॥

याचा अर्थ– संसाराचे गईं कोणा बरोबर स्वस्थ हृदयें करून विश्वास, स्नेह व बंधुत्व न मानावें. स्वइच्छा विहार जे जे राजे त्यां बरोबर सर्वथा स्थिर राहातील हें न मानावें.

काके शौचं द्यूत कारे च सत्यं सर्पे शांतिः स्त्री
षु कामोपशांतिः ॥ क्लीबे धैर्यं मद्यपे तत्त्वचिं
ता राजा मित्रं केन दृष्टं श्रुतं वा ॥ ५ ॥ ॥

सत्य भाषण, सर्पाचे ठाईं क्षमा, स्त्रियांचे ठाईं कामशांति, नपुंसकाचे ठाईं धीरता, मद्य प्राशन करणारांचे ठाईं परमार्थ विचार, आणि राजा याज बरोबर मित्रता, असें कोणी पाहिलें? अथवा ऐकिलें किं काय? भाव, राजा याची मैत्री आहे असें न जाणून सावध पणें वर्त्तणूक करावी·

नदीनांचनरवीनांचश्रृंगीणांशस्त्रपाणिनाम्॥
विश्वासोनैवकर्त्तव्यःस्त्रीषुराजकुलेषुच॥६॥

अर्थ- नदी, तिरवट नरवांचीं जनावरें, तसे श्रृंगांचे पशु, आततायी ह्मणजे शस्त्रधारी पुरुष, तशाच स्त्रिया आणि राजाचें कुळ यांचा विश्वास कधीं धरूंनये·

भोगिनःकंचुकासक्ताःक्रूराःकुटिलगामिनः॥
सुदुष्टामंत्रसाध्याश्चराजानःपन्नगाइव॥७॥

अर्थ- पृथ्वीपती सर्पाचे परी आहेत; कारणकीं, उभय तांचीं विशेषणें एकरूप आहेत; त्यांत राजा कडील विशेष णाचा अर्थ, विषयांचा उपभोग करणारे कवचें करून आच्छादित, आणिस्वभावें करूनउग्र, व कपटें करून वर्त्तता त, आणि भयंकर, परंतु सेवकानीं केवळ विच्यारें करून अनुकूळ करावयास योग्य असे आहेत· सर्पाकडील विशेष- णाचा अर्थ भोग ह्मणजे त्यास गण्या आहेत, आणि कंचु

[illegible] आहेत; प्रकृतीनें नि-ष्ठुर, वक्रगतीनें चालणारे अत्यंत दुष्ट दीर्घ दृष्टी परंतु शाबरादिक मंत्रें करून हस्तगत करावयास योग्य आहेत; तस्मात् उभयतांची तुल्यता भासत्ये पन्नग ह्मणजे संकटें करून व्याप्त ऐसेजे इतर राजे त्यांप्रत युद्धार्थ जाताहेत; हा अर्थ पाहातां राजेही पन्नग होत सारांश विक्रम राजा याणे स्नेहाचे ठाईं विपरीत भाव दाखविला यास्तव आजच उठून देशांतरास जावें या विषयीं श्लोक.

त्यजेदेकं कुलस्यार्थे ग्रामस्यार्थे कुलं त्यजेत्॥
ग्रामं जनपदस्यार्थे आत्मार्थे पृथिवीं त्यजेत्॥८॥

अर्थ- एका पुरुषाच्या योगानें कुलाचा नाश होतो असें आहे तर त्या पुरुषाचा त्याग करावा; आणि एका कुलाच्या योगाने ग्रामाचा नाश होतो असें आहे तर कुलाचा त्याग करावा; आणि एका गावाचे योगानें देशाचा नाश होतो असें आहे तर गावाचा त्याग करावा; आणि आपला जीव रक्षणां करितां पृथ्वीचा त्याग करावा.

हें बापाचें भाषण ऐकून कन्या बालपंडिता बोलती झाली कीं, तुह्मी हें योग्य भाषण केलें परंतु प्रभूपासून अपमान झाला असतां कोठेही मान्यता नाहीं, यास्तव प्रभूचें आर्जव करून मान वृद्धी करून घ्यावी.

प्रधानोप्यप्रधानःस्याद्यदिसेवाविवर्जितः॥९॥

याचा अर्थ– इतर जन पृथ्वीपतीची सेवा जर करतील तर ते प्रधान पदवीतें पावतील, आणि प्रधान ही अन्याया दिकें करून सेवेचा अनादर करील तर तो प्रधान पदवीपासून भ्रष्ट होईल तस्मात अत्यादरें करून प्रभुसेवा करावी.

आसन्नमेवनृपतिर्भजतेमनुष्यंविद्याविहीनम
कुलीनमपंडितंवा ॥ प्रायेणभूमिपतयःप्रमदा
लताश्चयःपार्श्वतोभवतितंपरिवेष्टयंति॥१०॥

याचा अर्थ– आपले समीप जो सेवा करितो तो मनुष्य विद्यारहित आणि नीच कुळीं उत्पन्न व चतुरकसाही असो परंतु त्याजवर राजा प्रीती करितो. सारांश पृथ्वीपती, तरुण स्त्रिया आणि वंध्या स्वभावें करून जो सांनिध्य असतो त्यासच आश्रित करता हेत.

वशंनयंतिविनताधन्वंतमपिपार्थिवम् ॥
तस्याभीष्टंस्वचतुराविचिन्वंतिसमीपगाः॥११॥

याचा अर्थ– प्रभूसमीप राहाणारे जे चतुर पुरुष ते, जो राजा दर्शनें करून सेवकांस भय करितो त्यातें मनोधारणें करून नम्रता धरून वश करिता हेत; व प्रभूस काय याव्याचें व प्रभू प्रसन्न व्हावयाचें पदार्थ अत्यादरें करून शोधिता हेत.

विद्यावतांगृहस्थानांशिल्पविक्रमशालिनाम् ॥
सेवावृत्तिंविदांचैवनाश्रयःपार्थिवंविना ॥ १२ ॥

अर्थ-विद्यावंत, चतुर, पराक्रमी, आणि राजसेवा करावया विषयीं निपुण असून महत्वाप्रतीं इच्छिताहेत, असे जे पुरुष त्यांस भूपती वांचून दुसऱ्याचा आश्रय कार्य कर्त्ता होत नाही.

येचमर्त्यामहोत्साहानोपगच्छंतिपार्थिवम् ॥
तेषामामरणंभिक्षांप्रायश्चित्तंविनिर्दिशेत् ॥ १३ ॥

अर्थ-जे पुरुष प्रधान पदवी करावयास योग्य, आणि महा उत्साह युक्त असून पृथ्वी पती प्रति सेवार्थ जात नाहींन त्यांस मरण पर्यंत भिक्षा, तपहीं प्रायश्चित्तें सिद्ध आहेत, तस्मात् बुद्धिमान् पुरुषजो त्याणें प्रभूचा सहवास करावा आणि स्नेह वृद्धी करावा असा अर्थ दिसतो.

सर्पव्याघ्रगजादीनांयेनयंतिवशंनराः ॥ तेषां
नृपवशीकारोनैवलोकेऽतिदुष्करः ॥ १४ ॥

अर्थ-सर्प, व्याघ्र, हस्ती इत्यादिक जे महाउन्मत्त पशू यांस, जे चतुर पुरुष आहेत ते वश करितात, त्यास राजादिक वश्य करणें हे विषय अवघड नाहींत.

राजानमेवसंश्रित्यविद्वान्यातिपरोन्नतिम् ॥
विनामलयमन्यत्रचंदनोननिवर्द्धते ॥ १५ ॥

अर्थ-विद्वान् पुरुषजोतो राजाश्रयें करून उत्कृष्टतेतें

ई जसा चंदन वृक्ष वृद्धी पावत नाहीं.

धवलान्यातपत्राणिवाजिनश्चमनोरमाः॥
सदारमाशमातंगाप्रसन्नेसतिभूपतौ॥१६॥

अर्थ- भूपाळ प्रसन्न झाला असतां श्वेत छत्र आणि सुंदर घोडे, निरंतर मदोन्मत्त असे हस्ती सहजांत प्राप्त होताहेत; यास्तव ह्या आठ श्लोकांचा भावार्थ जे चतुर पुरुष आहेत त्यांणी सावध पणानें ध्यानीं आणून राजसेवा करावी; संकट समयीं प्राणही देऊन कृपा संपादन करावी; ह्मणजे सेवकांचीं सकळ संकटें दूर होऊन परस्पर संपत्ति आणि सुख प्राप्त होतें, व पर लोक ही उत्तम होतो; या प्रमाणें पंडिता आपले पित्यास उपदेश करून ह्मणाली कीं, तुजला विक्रमा पासून विशेष योग्यता जाहाली, संकट समय प्राप्त जाहाला त्यास विच्यारें करून प्रभूचे संशय, तुह्मां सारिखे जे चतुर पुरुष त्यांहींच दूर करावे. तस्मात् तूं धैर्य करून विक्रमाचे सभेस जावें. आणि मत्स्यहास्याचें कारण माझी कन्या सांगेन ह्मणती असें बोलावें. नंतर ब्राह्मणानें जाऊन राजास निवेदन केलें तेव्हां राजानें बाल पंडितेस बोलाऊन आणिली; आणि ती येऊन आशिर्वाद करून बोलिली कीं, हे राजा

विक्रमा! विद्वान् आह्मिणीस कूटाचें विच्यारून व्यर्थ विटंबना करावी हें उचित नाहीं, मत्स्याचें हास्य आज पर्यंत कोणींच पाहिलें नाहीं, किंवा ऐकिलें हि नाहीं, आणिं हें अद्भुत वर्तमान आह्मा स्त्रियांस विच्यारावयास योग्य आहे कीं काय? सर्वांचा संशय परिहार करणार तूं यास्तव याचा विच्यार स्वस्थ आपण करावा हें उचित आहे; तथापि या विषयाचें तुजला कौतुक वाटत असलें तर सांगत्यें.

राज्ञीनाहस्पृशत्यस्मान्मत्स्यानपिमहासती ॥ पुरुषाख्यानतोराजन्नसतूशफरीध्रुवम् ॥१७॥

हे विक्रमा! या श्लोकाचा अर्थ आपणच करून ध्यानीं आणावा; इतकें बोलून बाल पंडिता स्वगृहास गेली. ही कथा सांगोन शुक ह्मणाला कीं, याचें उत्तर उद्दईक सांगेन असें श्रवण करून प्रभावती शयन करिती झाली.

## कथा ६

दुसरे दिवशीं प्रभावती जाते समयीं तिजला शुक बोलतो, या श्लोकाचा भाव विक्रम राजाच्या ध्यानांत येईना तेणें करून त्यास रात्री निद्रा आली नाहीं.

निद्राभङ्केकुतस्तेषांयेगुरुव्याधिपीडिताः ॥
अस्वाधीनकलत्रायेयेजिताश्चनवैरिणः ॥१॥

दुसरें दिवशीं बाल पंडितेस बोलाऊन आणून विक्रम बो

क्रमा! अर्थ कदापि विच्यारूनये सांगीतल्यास जसा पूर्वी वाण्याचे स्त्रीस पश्चात्ताप जाहला तसा तुजला होईल या जानें विच्यारिलें हें कसें? मग बाळपंडित्ता सांगत्ये.

पूर्वी उज्जनी नगरीचे ठाई सूमती नामें वाणी होता तो काहीं दिवसानंतर निर्धन जाहाला असतां त्याची स्त्री पद्मिणी इणें व स्वजनाहीं त्याचा त्याग केला.

यस्यार्थास्तस्य मित्राणि यस्यार्थास्तस्य बांधवाः॥
यस्यार्थः स पुमान्लोके यस्यार्थः स च पंडितः॥२॥
जीवंतोऽपि मृताः पंच श्रूयंते किल भारत॥ दरि
द्रो व्याधितो मूर्खः प्रवासी नित्यसेवकः॥३॥

व्यास ऋषीनें ही, पुरुषांची संख्या जीवंत असतां मृता समान केली ती असी कीं, दरिद्री, व्याधिग्रस्त, मूर्ख, प्रवासी व नित्य सेवा करणार असे जे पुरुष ते सर्वत्र अपमान पावतात; नंतर तो सूमती तृणकाष्ठादिकांचा विक्रय करून उदर पोषण करूं लागला. असें असतां एके दिवसीं तृण काष्ठ काहीं मिळालें नाहीं, तेव्हां वाटेनें येत असतां काष्ठाचा एक मोठा गणपती पाहिला आणि विच्यार केला कीं, हा गणपती मोडल्यानें माझें दोन दिवसांचें उदर पोषण होईल.

प्रसन्न होऊन बोलिला कीं, मजला छिन्न भिन्न करूनको
तुझे उदर पोषणार्थ पांच मांडे मी देत जाईन ते प्रातःका-
ळीं येऊन नेत जा; परंतु ही गोष्ट कोणास सांगूनये सांगीत
ल्यास मांडे प्राप्त होणार नाहींत, मग सुमती वाणी याणें
अवश्य ह्मणून प्रतिदिवसीं पांच मांडे घृतशर्करा सहित ये
ऊन जाऊं लागला. तेणें करून कुटुंबाचें पोषण करीत अस
तां एके दिवसीं वाणी याची स्त्री पद्मिणी तिणें आपले स
खीस मांडे दिल्हे तेव्हां सखी बोलिली कीं, हे मांडे तुज कोठू
न प्राप्त जाहाले ? तें मला सांग; नसांगशील तर तुझा व मा
झा स्नेह राहाणार नाहीं, नंतर पद्मिणीनें आपले भर्त्यास
निग्रह करून विच्यारिलें; ते समयीं सुमती वाणी बोलिला
कीं हें तुजला कशास पाहिजे सांगितलें असतां स्वार्थाचा
नाश होऊन पश्चात्ताप होईल. तथापि स्त्री आग्रहास प्र
वर्त्तली तेव्हां वाणी याणें विच्यार केला.

यस्मैदेवाप्रयच्छंतिपुरुषायपराभवम् ॥
बुद्धिंतस्यापकर्षंतिनसेवंतिमनोहितम् ॥ ४ ॥

अर्थ- देव जे ते जा पुरुषाचा पराजय करितात त्या पुरु-
षाची बुद्धी नष्ट होत्ये. तेणें करून पुरुष आपलें हित जाण
त नाहीं; यास्तव बालपंडिता ह्मणाली कीं, विक्रमा ! दैवही

[...] मांडे प्राप्त होण्याचें कारण सांगितलें ते ऐकून पद्मिणीनें आपले सखीस सांगीतलें. सखीनें आपले भर्त्यास कुऱ्हाड देऊन प्रातःकाळीं गणपती फोडावयास पाठविती जाहली. इतक्यांत रूमती वाणी ही तेथें आला हें पाहून गणपतीनें पाशें करून वाण्यास बांधिलें आणि ह्मणाला कीं, आज पासून पांच मांडे मज पासून घेऊन तुझ्या शेजाऱ्यास देत जा नाहीं तर मरण पावसील. हें वर्त्तमान घरीं स्त्रीस सांगीतलें आणि ह्मणूं लागला कीं, तुझे निमित्तें करून अनर्थ प्राप्त जाहाला. मग पद्मिणी पश्चात्ताप करिती जाहली. ही कथा बाळपंडिता राजास सांगून ह्मणाली कीं, राजा विक्रमा! यास्तव तुजला मत्स्य हास्याचें कारण सांगत नाहीं सांगीतल्यास पश्चात्ताप होईल. इतकें बोलून बाळपंडिता स्वगृहास जाती जाहली. हें वर्त्तमान प्रभावतीनें श्रवण करून शयन करिती जाहली.

## कथा ७

दुसरे दिवशीं जात्ये समयीं प्रभावतीनें शुकाप्रति विन्यारिलें कीं, पुढें कथा काय जाहली ती सांगावी. नंतर विदग्ध चूडामणी शुक बोलूं लागला कीं, विक्रम राजा याणें बाळपंडितेस बोलाऊन आणिली आणि मत्स्य हास्याचें कारण विचारिलें, तेव्हां बाळपंडिता उत्तर करिती जाहली.

चेद्रुच्चितत्वेदयासित्वंब्राह्मणोयथा ॥ १ ॥

अर्थ- हें श्रवण करून रति आणि प्रीती या दोंहीं शब्दांचा अर्थ एक असतां काय विशेषण समजून दोन्ही श्लोकांचे ठाईं योजिलेंस आणि तो ब्राह्मण कोण हें सांगावें ह्मणून विक्रम बोलिला नंतर बाळपंडिता बोलत आहे. आपला आत्मा त्यास जो स्वरूपाचा अनुभव ती रती, तिचा जो अतिशय बोध योजना त्यास प्रीती ह्मणावी. आतां कथा सांगेन ती श्रवण करावी.

पूर्वीं राजा वीर याचे वच्छोजन नामें नगरीचे ठाईं एक ब्राह्मणाचा पुत्र केशव या नामें राहात होता त्याणें एके समयीं मनांत आणिलें कीं, आपण वडिलांचे धनें करून उपजीवन करीत आहों हें अनुचित आहे.

उत्तमाःस्वगुणैःख्यातामध्यमाश्चपितुर्गुणैः॥
अधमामातुलस्यापिश्वसुरस्याधमाधमाः॥२॥

असा विच्चार करून पृथ्वी पर्यटणास निघाला आणि देवस्थानें, अनेक तीर्थें, नगरें, वनें, उपवनें फिरत असतां एके स्मशानाचे ठाईं सिद्ध पुरुष पाहिला, त्यास साष्टांग नमस्कार करून मी धनार्थी अतिथी आलों आहें असें बोलिला; नंतर सिद्ध पुरुषानें ब्राह्मणाचे दीन वचन श्रवण करून औदार्यास्तव करुणा येऊन बोलिला कीं, हे ब्राह्मणा ! हा शेंदूर

प्राप्त होईल. परंतु तूं योग्य कार्या पुरता स्पर्श करावा; आणि हा शेंदूर तूं दुसऱ्यास दिल्यानंतर उभयतांस उपयोग नहोतां हा गुप्त होईल. तो पुनः प्राप्त होणार नाहीं. नंतर ब्राह्मणानें तो शेंदूर घेऊन रत्नावती नगराप्रत जाता झाला. तेथें स्थगिका नामें एक वेश्या होती, तिचे ठाईं तत्पर होऊन अपार द्रव्य तिजला देऊं लागला; तेव्हां तिचे कुंटिणीनें शोध केला कीं, हा ब्राह्मण कांहीं व्यापार करीत नाहीं, आणि द्रव्य कोठून आणितो? हें वर्त्तमान काय आहे ह्मणून स्थगिकेस विचारिलें, तिणें केशव शर्मा यास विचारिलें तेव्हां त्या ब्राह्मणानें मोहास्तव स्वार्थ विसरून सर्व वर्त्तमान सांगून शेंदूर तिजला देता झाला. नंतर द्रव्य नाहींसें जाहलें तेव्हां कुंटिणीनें घरांतून बाहेर घालविला, तो राजद्वारीं जाऊन वाद विवाद करूं लागला मग कुंटिणीनें उत्तर केलें कीं, महाराज! हा दरिद्री कटिशूळाचे उपद्रवानें व्याप्त होऊन असंभाव्य गोष्टीचे तुफान आह्मावर घेतो हें कुंटिणीचें वचन ऐकून सर्वांनीं संमत करून ब्राह्मणास नगरा बाहेर घालविला. व शेंदूर ही गुप्त जाहाला ही कथा सांगून बाळ पंडिता ह्मणाली कीं, हे विक्रमा! स्थगिकेच्या आग्रहें करून शेंदूर तिजला उपयोगी जाहाला नाहीं आणि स्थगिकाही त्रास

मात्र जाहाला· ही अवस्था तुजला होईल यास्तव सांगत्यें श्लोकाचे अर्थाचा विच्यार आपणच करावा इतकें बोलून बालपंडिता स्वगृहाप्रति जाती जाहली·

## कथा ८

मित्रंनास्तिगृहंनास्तिनजातंस्वमनोहितम् ॥
पश्चात्तापोतियस्तापेसुभगेवमहामते ॥१॥

अर्थ–मित्र जो तो प्राप्त जाहाला नाहीं; गृह ही गेलें आणि स्वमनोहित हि जाहलें नाहीं, नंतर सुभगेस जसा संताप झाला तसा मत्स्य हास्यानें कारण श्रवण केल्यास तुजला होईल·

दुसरे दिवशीं प्रभावती शुकाप्रति विच्यारिती जाहली कीं, पुढें काय वृत्तांत जाहला तो सांगावा· तेव्हां शुक बोलतो· बालपंडिता तिसरे दिवशीं येऊन विक्रमा प्रति बोलती झाली कीं, हे विक्रमा! मत्स्य हास्यानें कारण मी तुजला सांगीतलें असतां वाणी याचे पुत्राचे अवस्थे सारिखें होईल· राजानें विच्यारिलें तें कसें? मग बाळपंडिता सांगत्ये·

पूर्वी विक्रम राजाचे त्रिपुरनगरींत सुंदर नामा वाणी राहात होता, त्याची स्त्री सुभगा महा व्याभिचारिणी होती· तीं एके समयीं बाहेर जात असतां भ्रतारानें निषेध केला· तेव्हां ती आपले सखीस सांगती जाहाली कीं, आज कोणी

एक पुरुष ठेवला व देवालयांत बसवून मला सांगावयास धा-वे. नंतर स्मगा निघत्ये समयीं सखीचे हातून आपले घरास अग्निप्रयोग करविला आणि आपण देवालयांत गेली तों परपुरुष आग कोठे लागली ह्मणून पाहावयास देवालयांतून बाहेर गेला. ही परपुरुष नाहीं असें पाहून स्वगृहास आली. तों गृह दग्ध जाहलें. मग पश्चात्ताप करिती जाहली. यास्तव विक्रमा! त्या श्लोकाचा अर्थ स्वतां ध्यानांत आणावा हें उत्तम आहे इतकें बोलून बालपंडिता स्वगृहाप्रत जाती जाहली. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहली.

## कथा ९

दुसरे दिवशीं प्रभावतीनें शुकास विचारिलें कीं, विक्रमानें मत्स्यहास्याचें कारण जें काय ध्यानांत आणिलें तें सांगावें, तेव्हां शुक बोलतो. विक्रमास स्वतां काहीं एक समजलें नाहीं. नंतर बालपंडितेस आणून सांगीतलें कीं, मजला तर एकाही श्लोकाचा अर्थ समजला नाहीं, तेव्हां बालपंडिता बोलत्ये. विक्रमा! इतके पर्याय सांगीतले तथापि तूं जाणत नाहीस, तरीं मी सांगत्यें श्रवण कर. पुष्पहास्य नामें तुझा प्रधान सर्वप्रधानामध्यें श्रेष्ठ आणि निर्दोषी; असें असतां कोणते कारणास्तव त्यास राजद्वारीं यावयाचा प्रतिबंध केलास? हें ऐकून राजा सांगता जाहला कीं, पूर्वीं

तून पुष्पें निघावीं हें वर्त्तमान सर्व राजे यांस समजलें तेव्हां राजे याणी आपले दूत चमत्कार पाहावयास पाठविले ते समयीं पुष्पहास्य याणें हास्य केलें नाहीं, आणि पुष्पें निघालीं नाहींत. हें पाहून त्यास प्रतिबंध केला. मग बालपंडिता ह्मणाली कीं, कोणत्या कारणास्तव पुष्पहास्य हंसला नाहीं, याचें कारण तुला समजलें काय? नंतर राजानें उत्तर केलें कीं, मजला समजलें नाहीं, नंतर बालपंडिता ह्मणाली कीं, अर्थ समजल्या वांचून त्याचा अधिकार दूर केलास येणेंकरून तुजला पातक जाहालें. सारांश हें समजलें नसतां मत्स्य हास्याचें कारण किमर्थ विच्यारितोस? विच्यारावयाचा आग्रह असेल तर पुष्पहास्यास आणून त्याचे हास्याचें व मत्स्य हास्याचें कारण विच्यारावें ह्मणजे तो सांगेल.- मग विक्रमानें तिचे वचनास्तव पुष्पहास्य प्रधानास बोलाऊन प्रधानपदवीचीं वस्त्रें देऊन दोनही कारणें त्यास विच्यारिलीं, तेव्हां पुष्पहास्य बोलिला कीं, घरांतील छिद्र कोणास न सांगावें असें आहे.

अर्थनाशंमनस्तापंगृहेदुश्चरितानिच॥ व
चनंचापमानंचमतिमान्नप्रकाशयेत्॥१॥

याचा अर्थ- बुद्धिमान् पुरुष, अर्थ नाश व मनास ताप

प्रगट करीत नाहींत, तथापि स्वामीची आज्ञा प्रमाण यास्त
व मी सांगतों. महाराज! माझी स्त्री पर पुरुषाचे गाई आस
क्त जाहाली हें समजलें. तेच दिवशीं स्वामीनीं सभेंत हांस
विलें तेव्हां अति दुःखें करून मी हँसलों नाहीं हें विक्रमा
नें श्रवण करून आपली स्त्री कमलिका समीप होती तिचे
आंगावर पुष्प टाकून हास्य वदनें करून अवलोकन केलें.
तेव्हां तिणें कपटें करून मूर्च्छा आणून भूमीवर पडली तें
पाहून पुष्पहास्य हंसूं लागला. ते समयीं मुखांतून पुष्पें प
डतीं जाहलीं. मग राजानें स्त्रीचें समाधान करून मूर्च्छेचा
परिहार केला; आणि बाळपंडितेकडे पाहून महा क्रोधें करू
न प्रधानास बोलता जाहाला कीं, आह्मास दुःख प्राप्त
जाहलें, त्या समयीं तुजला हास्य येऊन मुखांतून पुष्पें नि
घालीं असें बोलून प्रधानाची निर्भर्त्सना करिता जाहाला.
नंतर प्रधान बोलिला कीं, महाराज! कमलिका, पूर्व दिवशीं
खासदाराकडे गेली. तेव्हां तेथे जावयास विलंब जाहल्या
मुळें, खासदारानें पांच जेर बंद मारिले, तेव्हां तिळ शाय मू
र्च्छना आली नाहीं. आणि स्वामीनीं पुष्प आंगावर टाकिलें
तेणें करून मूर्च्छना येऊन अति श्रम जाहाले; हें पाहून म
जला हास्य आलें; हें भाषण श्रवण करून राजा प्रधानास

स तें सांग. नंतर पुष्पहास्य बोलिला कीं, या गोष्टीचा प्रत्य य स्वामीनीं एकांतीं कंचुकी काढून अवलोकन केल्यास स मजण्यांत येईल. हें ऐकून राजा विक्रमानें पाहिलें तों जेरबं द पाठीवर दिसले. मग प्रधान आणि बालपंडिता यां कडे पाहिलें नंतर पुष्प हास्यानें उत्तर केलें कीं, महाराज बालपंडि तेनें उत्तर गूढार्थ निवेदिलें; तेंच मी आज्ञेवरून प्रकट सां- गितलें. आतां मत्स्य हास्याचें कारण स्वतां ध्यानांत आणा वें, या प्रमाणें बोलिला. नंतर विक्रमानें स्त्री विषयीं आस्था सोडिली; आणि तिचे राहावयाचे ठिकाणाचा शोध केला तों एक पुरुष पेटींत सांपडला; तो व खासदार व स्त्री कम लिका, या तिघांचा शिरच्छेद केला; नंतर बालपंडितेस सन्मानपूर्वक घरास पाठविली. ही कथा शुकानें प्रभाव तीस सांगून बोलिला कीं हा वृत्तांत ध्यानांत आणून, या कर्मानें गई आसक्त न व्हावें असें शुकाचें भाषण आणि विक्रमाचा वृत्तांत व कमलिकेचा परिणाम श्रवण करून प्रभावती स्वगृहींच शयन करिती जाहाली.

## कथा १०

दुसरे दिवशीं प्रभावती प्रत शुक बोलतो. पूर्वीं राज पूर नामें एक स्थान होतें तेथें देवल नामा कुटुंबी राहात

सती एके दिवशीं देवल बाहेर गेला तेव्हां तिणें एक पुरुष आणून त्याज बरोबर क्रीडा करावयास लागली. इतक्यांत देवल हातांत अपूर्व फळ घेऊन आला. हें पाहून तिची सखी श्रृंगारदेवी शेजारीं राहात होती तिणें शीघ्र येऊन सुभगा नग्न होती तिला तशीच बाहेर घेऊन आली. ती देवलयाणें पाहून विच्यारिलें कीं हें काय? तेव्हां श्रृंगार देवीनें सांगितलें कीं, तुह्मी फळें आणिलीं तीं पाहातांच इची अवस्था या प्रकारची जाहाली. तर हीं फळें जेथींचीं तेथें नेऊन टाकावीं. ह्मणजे ही स्वस्थ होईल; हे श्रृंगार देवीचें वचन, त्या मूर्खानें सत्य मानून फळ टाकावयास गेला; मग सुभगेनें परपुरुष आणिला होता तो श्रृंगार देवीनें बाहेर काढून दिल्हा. हें चातुर्य तुजला असेल तर परपुरुषाकडे जावें असें शुकाचें भाषणश्रवण करून प्रभावती शयन करिती जाहली.

## कथा ११

दुसरे दिवशीं प्रभावतीप्रत शुक बोलतो.

गतयापित्वयातत्र कर्त्तव्यंकिंचिदद्भुतम्॥ यथारंभिकयापूर्वंब्राह्मणार्थमाहाद्भुतम्॥१॥

पूर्वीं दाभोळ ग्रामीं विलोचन नामें ग्रामाधिकारी राहात होता. त्याची स्त्री रंभिका परपुरुषासक्त, परंतु विलोचना

रंभिका उदक आणावयास गेली; तेथें एक ब्राह्मणाचा पुत्र परम सुंदर क्रीडा करावयास आला होता त्या कडे इणें पाहिलें, तों ब्राह्मण रंभिके समीप येऊन बोलिला कीं, काय आज्ञा करि तेस? नंतर रंभिकेनें त्याचा भाव आपलेच ठाई आहे असें जा णून सांगीतलें कीं, माझे पाठी मागून यावें, आणि माझा भ्रता र घरीं आहे त्यास नमस्कार करून बसावें पुढें बोलण्याचें साधन मी जसें करीन तसेंच तूं बोलावें; या प्रमाणें संकेत क रून आपण घरीं आली. ब्राह्मण पाठी मागून येऊन तिचा भ्रतार विलोचन यास नमस्कार करून बसला. इतक्यांत रंभिका घरांतून बाहेर आली आणि विलोचना प्रति बोलि ली. कीं, त्यास ओळखिलें नाहीं? हा माझे मावशीचा पुत्र, पूर्वी लहान असतां घरांतून रागें भरून गेला होता तो सांप्रत भे टावयास आला आहे असें बोलिली. त्या नंतर विलोचन उठून ब्राह्मणास भेटता जाहाला नंतर त्याचे घराचें वर्तमा न उगेंच विच्यारिलें तेव्हां सर्व तसेंच आहे ह्मणून ब्राह्मणा नें सांगीतलें, नंतर विलोचन समाधान पावून स्त्रीस बो लिला कीं, आपले बंधूस वर नेऊन भोजनादिक सत्कार क रावा. असें सांगून आपण निद्रा करावयास गेला. तिणें अ वश्य ह्मणून ब्राह्मणास स्वयंपाक घरा मध्यें नेला. आणि भो

लू लागली· तेव्हां ब्राह्मण ह्मणो लागला की, तू आपला भा
ऊ ह्मणविलास त्यास तूं माझी बहीण हें सत्य आहे; दुसरा
विच्यार करावयाचा नाहीं· हे वचन श्रवण करून रंभिकेनें
बहुत बोध केला तथापि हा ऐकेना; ते समयीं पुकार करू
न कोणी धांवारे धांवा असें बोलिली तेव्हां ब्राह्मण भयाभी
त होऊन, तिजला साष्टांग नमस्कार करून बोलिला कीं,
आज माझा प्राण रक्षावा; मी तुझें मान्य केलें· इतकें बोल-
तांच रंभिकेनें तूप भात ब्राह्मणाचे पात्रीं शेष राहिला होता
तो चहूंकडे उडविला आणि समीप शेगडींत अग्नि प्रदीप्त
करून ठेविला असें असतां कोणीं धांवा हा शब्द ऐकून
विलोचन धावता जाहाला तेव्हां त्यास सांगीतलें की, या-
जला, अकस्मात मोडशी जाहली, यास्तव शेकावयास
अग्नि आणून प्रदीप्त करावया विषयीं धांवा ह्मणून हाक
मारिली· परंतु आता सावध आहे चिंता नाहीं, असें बोलू
न तूप भात उडविला होता तो विलोचनास दारववला,
त्या मूर्खानें सत्य मानून निजावयास गेला· इकडे रंभिका
ब्राह्मणा सहवर्त्तमान क्रीडा करिती जाहली· ब्राह्मण ही
मोडशीचे निमित्तें करून एक मास रंभिकेचे घरीं राहिला;
नंतर आपले घरीं जाता जाहला· ही कथा श्रवण करून

प्रभावती अद्भुत मानून शयन करिती जाहली.

## कथा १२

विपरीते समायाते येद्विवेत्सि त्वमुत्तरम् ॥
यथा शोभिकया जारो वृक्षस्य विटपे कृतः ॥ १ ॥

याचा अर्थ – हे प्रभावती ! विपरीत काल प्राप्त जाहाला असतां जसें पूर्वी शोभिका इणें जार पुरुषास वृक्षावर चढवून रक्षण केले. तसें तूं स्वतां करावयास जाणत असलीस तर जा.

दुसरे दिवशीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे. पूर्वीं लगुड ग्रामीं एक कुंभार धनवंत राहात होता त्याची स्त्री शोभिका नामें व्यभिचारिणी, ती एके समयीं पर पुरुष आणून त्याज बराबर क्रीडा करिती जाहली. असें असतां तिचा पती बाहेर गेला होता तो येता जाहाला. ते समयीं शोभिकेनें काय उत्तर करावें तें तूं सांगशील ? असें प्रभावतीस विच्यारिलें तेव्हां प्रभावती ह्मणाली कीं, मजला याचें उत्तर सूचत नाहीं, मग शुक बोलतो आहे. शोभिकेनें पती येतो असें पाहून परपुरुषास सांगीतलें कीं हा बाभळीचा वृक्ष आहे याजवर तूं चढावें नंतर तो घाबरा होऊन त्या वृक्षावर नग्न चढला, त्यास पाहून कुंभार याणें विच्यारिलें कीं, हा कोण आहे ? मग स्त्रीनें सांगीतलें कीं, हा आपले शत्रूच्या भयें करून वृक्षावर चढला आहे. आपल्यास शरण आला

असतां याचें संरक्षण करावें तेव्हां कुंभारानें त्यास अभय देऊन खालीं उतरिला आणि वस्त्रें देऊन घरीं पाठविला. तो जाते समयीं शोभिकेचे हातावर हात मारून टाळी वाजवून ह्मणाला कीं, आज तूं मला वांचविलेस शाबास। हें सर्व कुंभारानें पाहिलें आणि उगाच राहिला. ही कथा श्रवण करून प्रभावती स्वगृहांच शयन करिती जाहली.

## कथा १३

व्रजदेवि वरं जारं यत्र ते रमते मनः ॥ यथा राजिकया पूर्वमर्ई भक्तपतौ कृतम् ॥ १ ॥

याचा अर्थ - हे प्रभावती! जर तुझें मन, उत्तम जाराकडे रमावें असें असल्यास जा, परंतु जसें पूर्वी राजिकेनें आपले पतीस भोजनास बसऊन कार्य केलें तसें तुजला येईल तर जावें. दुसरे दिवशीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे.

पूर्वी हस्तनाम नगराचे ठाई एक वाणी राहात होता, त्याची स्त्री राजिका अति सुंदर, व्यभिचारिणी, असें असतां, एके समयीं तिचा भ्रतार भोजनास बसला तेव्हां घरांत तूप नाहीं, तें आणावयास जात्यें असें बोलून पैसे घेऊन गेली जावयाच्या पूर्वी परपुरुषाचा संकेत करून ठेविला होता. तेथे जाऊन त्याज बराबर क्रीडा करिती जाहाली नंतर घरीं जात्ये समयीं आंगावर धूळ उडवून घेतली व कांहीं

[illegible] घरी घेऊन आली; तो भ्रतार क्रोधयुक्त जाहाला ते समयीं ह्मणाली कीं, स्वामी माझा अपराध नाहीं. तूप आणावया करितां त्वरेनें जात असतां पैसे वाटेंत हारपले; त्यांचे शोधास विलंब जाहाला परंतु सांपडले नाहींत. मग आपल्यास क्रोध आला असेल असें जाणून, ज्या ठिकाणीं पैसे पडले तेथील माती घेऊन आल्यें आहे; नंतर वाण्यानें मातींत पैसे शोधिले परंतु सांपडले नाहींत, तेव्हां स्त्रीस ह्मणाला कीं, जें होणार तें कदापि चुकत नाहीं. असें बोलून तुप वाचून भोजन करिता जाहाला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहली.

## कथा १४

युक्ताबुद्धिर्विशालाक्षिपररंतुयदृच्छया॥ग
च्छत्वंयदिवावेत्सिधनश्रीरिवभाषितुम्॥१॥

याचा अर्थ- हे प्रभावती! स्व इच्छें करून पर पुरुषा प्रति रमावें असी तुझी बुद्धी जाहली आहे तर जावें परंतु धनश्री सारिखें भाषण करावयास जाणत असलीस तर जा.

दुसरे दिवशीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे. पूर्वीं पद्मावती नगरीचे ठाईं धनपाळ नामें सावकार राहात होता त्याची स्त्री रुक्मिणी प्राणाहून प्रिय, असें असतां एके समयीं धनपाळ काहीं द्रव्य घेऊन व्यवहार करावयास गेला,

आपले दुःखांत निमग्न राहिली. असे काहीं दिवस गेले; पुढें वसंत ऋतु आला मग अधीक विरह होऊन सखीजना समीप आपले तारुण्याची व स्वरूपाची निंदा करूं लागली. तिचा भाव पाहून धनश्री नामें सखी बोलली. कीं हा वसंत ऋतू या समयांत यौवन वृथा घालवावें हें उचित दिसत नाहीं, तरीं काही सार्थकता करावी मग रुक्मिणी ह्मणाली कीं, एक पुरुष सुंदर क्रीडा करावयास आणावा. तेव्हां धनश्रीनें पुरुष आणावयास सखी पाठविली, आणि रुक्मिणीचे वेणीतील अलंकार येतले त्या समयास तिचा पती परदेशांतून घरीं आला. तेव्हां धनश्री सखी बाहेर येऊन धनपाळ पती बोलती जाहली कीं, आपण क्षणमात्र बाहेर उभे राहावें मी घरांतून येतें असें बोलून घरांत गेली; आणि रुक्मिणीची वेणी शेवटास थोडी कापून देवापुढें ठेविली; आणि देवाची पूजा करून धनपाळ यास घरांत नेऊन देवांस उभयतानीं नमस्कार करावा, ह्मणून धनश्रीनें सांगीतलें तेव्हां नमस्कार करिते समयीं देवा समीप वेणीचे केश पाहून ह्मणाला कीं, हें काय? मग धनश्रीनें उत्तर केलें कीं, तुह्मी देशांतराहून सुरक्षीत घरीं यावें, तेव्हां वेणी देवास द्यावी. असा रुक्मिणीनें नवस केला होता; तो आज परिपूर्ण जाहला. धनपाळ

याणें सत्य मानून संतोष पावला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा १५

याहिचेद्यातुमिच्छातेरंतुंकुत्रापिवेत्सिचेत्॥
श्रीदेवीववरंकर्तुंव्यभिचारस्यगोपनम्॥ १॥

याचा अर्थ- हे प्रभावती! तुझी इच्छा कोणी उत्तम पुरुष याज कडे जावें असी आहे तर जा. परंतु श्रीदेवी सारिखें व्यभिचार कर्माचें आच्छादन होईल असें जाणत असल्यास जावें.

दुसरे दिवशीं प्रभावतीप्रत शुक बोलतो आहे. पूर्वीं विमल नाम नगरीचेठाईं शालिगोद नामें वाणी राहात होता; त्याची स्त्री जया व पुत्र गुणाकर, सून श्रीदेवी ही कबुद्ध नामा वाणी याज बरोबर व्यभिच्यार करीत असे; असें असतां मोठा लोकापवाद जाहला एकदां तिचा भ्रतार यास आम्हांनीं सांगीतलें तथापि त्याणें मनास आणिलें नाहीं, मग एके समयीं तिचा सासरा शालिगोद याणें, श्रीदेवीनें पर पुरुषास घेऊन निद्रा केली आहे असें पाहिलें आणि तिच्या पायांतील पैंजण काढून घेतला. श्रीदेवीनें हें समजनांच परपुरुषास बाहेर घालविला आणि आपला पती गुणाकर या समीप येऊन निजली. मग मध्य रात्रीस उठून गुणाकरास जागें करून सांगीतलें कीं तुझे पित्यानें येथें

घेऊन माझे पायांतील पैंजण काढून घेतला; हें वडीलपणास उचित होय कीं काय? असें श्रवण करून गुणाकर बोलिला कीं मी प्रातःकाळीं आपले पित्या पासून वेगळा राहीन. नंतर प्रातःकाळ होतांच गुणाकर याणें पित्याची बहुत निंदा केली; तेव्हा पिता शालिगोद म्हणाला कीं, श्रीदेवीनें परपुरुषावरोबर शयन केलें होतें. असें पाहून पैंजण काढून घेतला. नंतर श्रीदेवी म्हणाली कीं, परपुरुषास मी आणिलें नाहीं, व स्पर्शही केला नाही, या अर्थी दिव्य करीन तो दिव्याचा पर्याय असा कीं, नगराचे उत्तरेस एक यक्षाची मूर्त्ती पाषाणाची उभी आहे; तेथे जो असत्य वादी आहे तो पाया खालून पार होत नाहीं, हें प्रसिद्ध आहे; तेंच दिव्य करीन. नंतर शालिगोद याणें उदयीक दिव्य करावे, असा निश्चय केला; नंतर श्रीदेवीनें स्कबुद्धी परपुरुषास एकांतीं आणून सांगीतलें कीं, उदईक दिव्य करणार त्यास मी जेथें असेन तेथें तूं वेड घेऊन यावें, आणि माझे कंठास धरावें असा निश्चय केला, आणि प्रातःकाळीं सर्व महाजन बोलाविले, आणि श्रीदेवी सकल पूजा सामग्री घेऊन यक्षा समीप गेली, तेथें सरोवराचे ठाईं स्नान करून येऊं लागली ते समईं पूर्व संकेतानुरूप स्कबुद्धी येऊन तिचे कंठाचे ठाईं हात ठेऊन अवाच्य बडबडूं लागला. नंतर ती, अरे मूर्खा हें काय केलेंस? असें बोलून स्पर्श जाहाला, यास्तव

पुनः स्नानास गेली. हें सद्बुद्धीचें कृत्य सर्व लोकानीं पाहून काहीं भ्रमिष्ट आहे असें समजून दूर घालविला. मग श्रीदेवी पुनः स्नान करून यक्षाची पंचोपचारें पूजा करिती जाहाली. आणि सर्व लोक श्रवण करीत असतां प्रार्थना पूर्वक यक्षास बोलिली, कीं, आपला पती आणि हा पुरुष ह्या उभयतांच्या स्पर्शावांचून तिसरे पुरुषाचा स्पर्श व्यभिचार बुद्धीनें केला नाहीं, हें जर सत्य आहे तर, आपले पायां खालून मजला वाट द्यावी; असें बोलून सर्व लोक पाहात असतां यक्षाच्या पाया खालून पार गेली. यक्ष ही आपले चित्तांत चकित जाहाला. कीं, तिचें चातुर्य अधिक जाहलें; नंतर सर्व जनांहीं ही पतिव्रता असें बोलून श्रीदेवीचा बहुत सन्मान केला; ही कथा सांगून शुक बोलिला कीं हें चातुर्य तुजला असेल तर तूं स्वकार्यास सुखरूप जावें; असें ऐकून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा १६

सत्यमेवत्वयाभद्रेकर्त्तव्यंस्वमनोगतम् ॥ चपलेवविजानासियदिकर्त्तुंप्रभावति ॥ १ ॥

याचा अर्थ—हे प्रभावती! तुझे मनांत जसें असेल तसें निश्चयें करून कर. परंतु चपलेनें जसें केलें तसें जाणत असलीस तर करावें.

दुसरे दिवशीं प्रभावती जात असतां शुक बोलत आहे

कीं, पूर्वी विषाद नगरीचे ठाईं जन वल्लुभ वाणी याची स्त्री चपला, व्यभिच्यारिणी होती ती नित्य अंगणांत शयन करीत असे; हें वर्त्तमान जनवल्लुभ याणें आपले बंधुवर्गास सांगीतलें आणि ह्मणाला कीं माझें ऐकत नाहीं आणि बाहेर शयन करित्ये तेव्हां सर्व बंधु वर्गांनीं नेम केला कीं, आज पासून जो बाहेर निजेल, तो सर्वांचा अपराधी; असा निश्चय केल्या नंतर एके दिवशीं चपला, भर्त्यास निद्रा लागली असें पाहून आपण परपुरुषाकडे गेली; इकडे जनवल्लुभ जागा होऊन पाहातो तों चपला आंगणांत निद्रा करावयास गेली. असें जाणून दार लाविलें, आणि आपण निद्रा करिता जाहाला. नंतर चपला क्रीडा करून घरीं आली तों दार लाविलें, असें पाहून एक मोठा धोंडा घेऊन आडांत टाकिला; आणि आपण दाराजवळ अंधेरांत उभी राहिली; इतक्यांत जनवल्लुभ जागा होऊन ह्मणाला कीं आपली स्त्री आज रुसली होती यास्तव तिणें आडांत उडी घातली, असें मनांत आणून उठला, आणि बाहेर येऊन हाक मारूं लागला इतक्यांत चपला घरांत जाऊन दार लाऊन निजली हें सर्व बंधुवर्गांनीं पाहून जनवल्लुभ याचा उपहास करूं लागले कीं, हा स्त्रीचे ठाईं अति मोहित आहे. नंतर स्त्री दुसरे दिवशीं ह्मणाली कीं मी घरांत भूमीवर निजल्यें असतां तुह्मीं

बाहेर गेलो यास्तव मी तुह्मास दार उघडलें नाहीं. त्या दिवसा पासून उभयतानीं निश्चय केला कीं, तुमचा व आमचा विवाद नसावा हें ऐकून जनवल्लभ यास संतोष जाहाला, ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहली.

## कथा १७

विधेहि स्कंदरितथायोजितंवर्त्ततेयथा ॥ कर्तुंशक्तासिचेद्योग्यंगुणाढ्योब्राह्मणोयथा १

याचा अर्थ– हे प्रभावती ! तुझे मनांत जशी योजना विद्यमानी आली आहे तसें कर. परंतु गुणाढ्य ब्राह्मणा सारिखें योग्य करण्या विषयीं सामर्थ्य असेल तर करावें.

दुसरे दिवशीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी विशाळ नामें नगरीचे ठाईं राजा विक्रम राज्य करीत असतां तेथें गुणाढ्य नामें एक ब्राह्मण राहात होता तो देशांतरास, एक बैल घेऊन उदर पोषणार्थ गेला तो एके नगरीं वेश्येचे घरीं राहिला. तेव्हां तिचे कुंटिणीनें बैलाचा अपहार करावा त्या लोभें करून त्या ब्राह्मणा बरोबर स्नेह केला. रात्रौ गुणाढ्य याणें वेश्येचा उपभोग करून मध्य रात्रीस तिचे हातांतील एक, सोन्याचा तोडा घेऊन बैला सहवर्तमान निघाला. नंतर कुंटिणीनें प्रातःकाळीं पाहिलें तों बैल व तो ब्राह्मण सोन्याचा तोडा घेऊन पळाला. असें

पाहून आपला नाश दुसऱ्याशीं नसांगावा ह्मणूनउगीच राहिली. दुसरे दिवशीं गुणाढ्य अकस्मात मार्गामध्ये हातांत तोडा घेऊन येताना पाहिला, त्याणें ही कुंटिणीस पाहिली. आणि ह्मणतो, माझा एक तोडा पूर्व दिवशीं बलात्कारें करून घेतलास तो द्यावा नाही तर मी राजा विक्रमास सांगेन. असें कुंटिणीनें बोलावयाचे पूर्वींच बोलूं लागला तेव्हां कुंटिणीनें विक्रमाचे भयें करून गुणाढ्यास आपले घरीं नेऊन एकांतीं बसऊन दुसरा तोडा देऊन समजाविला आणि ह्मणाली कीं माझे दोन्ही तोडे घेऊन रात्री उपभोग ही केलास! बरें असो परंतु माझा तोडा वेश्येनें घेतला असें पुनः न बोलावें, कारण ज्या गोष्टींत माझें लघुत्व आहे. असें ऐकून ब्राह्मणानें अवश्य ह्मणून आपले घरास गेला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाह्याली.

## कथा १८

गच्छदेविनतेदोषो गच्छंत्याःपरवेश्मनि॥
यदिबुद्धिस्तवास्त्यत्र भद्रेस्पर्शेपिचोरवत्॥१॥

याचा अर्थ—हे प्रभावती! तूं परपुरुषाचे घरी गेलीस तथापि तुला दोष ठेवीत नाहीं, परंतु पूर्वीं जसें चोरास धरिलें त्या समयीं जसी त्याला आपण स्फूर्त जावें असी बुद्धी होती, तसी तुजला असेल तर जावें.

पूर्वी शुभस्थान नगरीचे ठाईं दरिद्री नामा वाणी रहात होता. त्याचे घरीं दिपवाळीचे दिवशीं कोणी चोर चोरी करावयास गेला. तेव्हां त्याचे घरांत एक शेर शिरस सांपडले, ते घेऊन बाहेर आला इतक्यांत गस्तीचे लोक जात होते त्याणी त्यास धरिला, आणि शिरस त्याचे गळ्यांत बांधून नगरांत फिरविला तो: मार्गांत कोणी विच्यारी त्यास, याबोलण्यात काही जीव नाहीं असें बोलूं लागला हें राजानें श्रवण करून चोर आपलेजवळ आणविला; आणि त्यास विच्यारिलें कीं, सर्वांस हें उत्तर करितोस याचा भाव काय? नंतर चोर ह्मणाला कीं, दिपवाळीचे दिवसांत या देशीं शिरस होतात ते गळ्यांत बांधावे हा सांप्रदाय आहे असें असतां, आपले सेवकानीं विनोदानें शिरस माझे गळ्यात बांधिले हा अन्याय केला; असा राजा कोण आहे कीं, चोरास हें शासन असावें! असा चोराचा भाव पाहून विस्मय करून चोर सोडिला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा १९

कुरु यद्रोचते भद्रे कर्तुं प्रवेत्सि चेत्तथा ॥ यथा संतिकया भर्त्ता स्वबुध्याच विमोचितः ॥ १ ॥

याचा अर्थ - हे प्रभावती! जें तुला गोड वाटेल तें कर. परं

तु जसें पूर्वी संतिका इणें आपला भ्रतार स्वबुद्धी करून सोडविला तसें जाणत अससील तर जा.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी कऱ्हाड देशाचे ठांई गुणाकर मय राजा राज्य करीत होता तेथें, कामाविष्ट नामें सावकार त्याची स्त्री संतिका परम पवित्र होती. त्याचे शेजारीं दुसरे वाण्याची स्त्री स्वच्छंदा नामें व्यभिच्यारिणी होती ती नित्य कामें करून चेष्टित होऊन त्याजबरोबर संग करावा असें साधन करीत असे, परंतु कामाविष्ट तिची गोष्ट न आइके; तेव्हां एके समयीं कामाविष्ट, मनोरथ नामा एक यक्ष त्यास नमस्कार करावयास गेला, हें ध्यानांत ठेऊन, स्वच्छंदा ही पाठी मागून गेली, आणि शृंगार गोष्टी सांगून कामाविष्ट यास अनुकूल केला; नंतर उभयतांचा समागम घडला. हें वर्त्तमान नगरांत राज सेवक फिरत होते त्यांस समजतांच कामाविष्ट यास धरावें ह्मणून यक्षाच्या देवळांत जाऊन, दरवाजे बंद करून बसले हें वर्त्तमान संतिकेनें घरीं ऐकून, आपले पतीचा उपहास होईल यास्तव आपण पालखींत बसून, समागमें मंगळ वाद्यें घेऊन देवालयास गेली. आंत जाते समयीं राज सेवकानीं निषेध केला त्यांस सांगीतलें कीं, यक्ष दर्शन करावें हा माझा नियम आहे, याज करितां जाऊं द्यावें. असें बोलून त्यांस कां

ऊन पालखींत बसऊन घरी पाठविली; आणि आपण कामा विष्टा समीप राहिली. नंतर कोतवाल याणें येऊन देवालयां त पाहिलें तों, हीं उभयतां स्त्री पुरुषें आंत आहेत, परंतु पर स्त्री नाहीं असें पाहून आपले ठाईं लज्जित होऊन घरास आला; नंतर कामाविष्टास घेऊन संतिका ही आपले घरास आली; ही कथा सांगून शुक बोलिला कीं हें चातुर्य तुजला असेल तर पर पुरुषाकडे जावें असें श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा २०

गच्छदेविमनोयत्ररमतेतेप्रभावति ॥ कालिकावद्यदावेत्सिपतिवंचनमद्भुतम् ॥१॥

अर्थ- हे प्रभावति ! तुझें मन ज्याचे ठाईं रमत असेल, त्याजकडे जा; परंतु कालिके सारिखें आपले पतीचें वंचन करावें असें अद्भुत कृत्य जाणत असलीस तर जावें.

पूर्वी चमवती नदीच्या तीरीं शेष पूर नामें नगर होतें तेथें शूरराक्षस नामा धनवंत शेटी होता त्याची स्त्री कालिका ती पर पुरुषाचे ठाईं आसक्त होऊन, नदीचे तीरीं सिद्धेश्वर पुरांत एका ब्राह्मणाशी संग करीत असे, ती सखीस बरोबर घेऊन जाते समयीं घागरीनें नदी पार उतरून जावें आणि या

वें. या प्रमाणें किती एक दिवस जाहाले पुढें स्रुराक्षस याणें हें वर्त्तमान कर्णोपकर्णी श्रवण केलें आणि त्याचा शोध करावा ह्मणोन रात्रीं कृत्रिमें करून निद्रा करिता जाहाला. तेव्हां कालिका त्याजवळून उठून चालिली. तव तिचे पाठी मागून आपण ही गेला. ती शेजारीण सखी सोबतीस घेऊन घागरीनें नदी उतरून पार गेली. हा ही त्यांस नकळतां पार गेला. इतक्यांत कालिकेनें आपला पती पाहिला; मग अकस्मात आपण व सखीनें दोन्ही घागरी उदकानें भरून घेऊन सिद्धेश्वर पुरींत सिद्धेश्वर देव होता त्याच्या देवळांत गेल्या, स्रुराक्षस ही त्यांस नकळतां तेथें गेला. नंतर कालिकेनें दोन्हीं घागरींतील उदक देवावर घालून प्रार्थना केली कीं, हे देवा! पूर्वी स्वप्नामध्यें तूं सांगीतलें होतेंस कीं, जर तूं मध्यरात्रीस मला अभिषेक न केलास तर तुझा पती पांचा दिवसांत मरण पावेल. यास्तव मी येऊन अभिषेक केला, तर माझा पती शतायु असो; असें हात जोडून बोलिली. सखी आंधारांत उभी होती तिणें तथास्तु असें उत्तर दिलें. स्रुराक्षस याणें देव वचन बोलला असें जाणून संतुष्ट होऊन घरास आला; कालिका ही पाठी मागून स्वकार्य साधून घरास गेली. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

निजेच्छापूरणोर्थायतर्हिगच्छयथासुखम् ॥
बुद्धिर्यदियथातस्यामंदोदर्याःसहायिनी ॥१॥

याचा अर्थ- हे प्रभावती! जर आपली इच्छा परिपूर्ण करावी असें असल्यास सुखें करून जा. परंतु मंदोदरीस जसी पूर्वी आपलें रक्षण करावया विषयीं बुद्धी होती नसी तुजला असेल तर जा.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी प्रतिष्ठा नगरीचे ठाईं हेमप्रभ नामें राजा होता. आणि प्रधान श्रुतशील व यशोधन नामें सावकार व सावकाराची स्त्री मोहिनी आणि मंदोदरी कन्या ती यशोधन याणें, कांतीपुरीहून श्रीवत्स नामें सावकार आला होता त्यास दीधली. त्याचा परम स्नेह अधीक असें असतां मंदोदरी गर्भिणी जाहाली, आणि तिजला डोहाळे जाहाले कीं, मयूराचें मांस भक्षावें, तेव्हां राजास परम प्रिय असा एक मयूर नगरांत फिरत असे तो कोणास न कळतां तिणें मारून भक्षिला. आणि राजाचा नेम असा असे कीं, भोजन समयीं मयूरानें समीप असावें, मग राजानें भोजन करावें. असा नेम असतां, ते दिवसीं मयूर आला नाहीं, ह्मणून राजानें नगरांत ताकीद केली कीं, कोणी मयूर लपविला असेल तर सत्वर सोडावा. नाहीं तर पत्ता लागल्यास पारिपत्य होईल नंतर हे वर्त्तमान एके कुं

र्भिणीनें भक्षण केलाअसेल, त्याचा शोध करून राजास
सांगीतलें तर राजा प्रसन्न होईल; यास्तव शोध करावयास
निघाली तों अकस्मात मंदोदरीचे घरीं आली. आणि मंदो
दरी गार्भिणी पाहून तिजला उपदेश करूं लागली कीं, डो-
हाळ्यास मयूराचें मांस खावें असें वाटलें तर उत्तम आहे. नं
तर स्वभावें करून मंदोदरीनें उत्तर केलें कीं, तें भक्षिले. ते
व्हां ती बोलिली कीं, एथें अकस्मात मयूर मिळावयाचा क
ठीण, परंतु तुजला मिळाला तर या गर्भांत कोणी दैववान
आहे, मग तिणें सांगीतलें कीं, राज मयूर होता तो अकस्मा
त घरावर बसला होता तो, मारून भक्षिला. हें ऐकून तिणें
जाऊन राजास सांगीतले; इकडे मंदोदरी मोरा विषयीं बो
भाट ऐकून सावध जाहली; नंतर राजा ह्मणाला कीं, अ
साक्ष गोष्टीचें प्रमाण कशावरून धरावें? मग कुंटिणीनें
हें वर्त्तमान ऐकावें ह्मणून प्रधानास एके पेटींत घालून मंदो
दरीचे घरीं नेला. आणि तिला सांगीतलें कीं, माझी काहीं
वस्तभाव ह्या पेटींत आहे; ही पेटी दोन घटिका तुझे घरीं
ठेवितें असें बोलून ठेविली आणि आपण स्वभाविक पेटी
जवळ बसून मंदोदरी जवळ पुनः मयुराची गोष्ट काढिली.
कीं, तुजला मयूर कसा प्राप्त जाहाला तें सांगावें; तेव्हां

तिणें विश्वासें करून पूर्ववत् सर्व वृत्तांत सांगीतला; तो ऐकतांच कुंटिणीनें पेटीवर हात मारिला, हें मंदोदरीनें पाहून कांहीं कृत्रिम आहे असें समजून ह्मणाली कीं, हे सखी! मयूर भक्षिला हे, पाहात आहें तों प्रातःकाळ जाहाला; या स्वप्नाचा भाव काय? तो सांगावा. इतकें श्रवण करितांच प्रधान बाहेर निघून राजास तें वर्त्तमान सांगीतलें, आणि ती कुंटीण, मातबर सावकाराची इज्जत घेत होती, ह्मणून गाढवावर बसवुन नगरा बाहेर घालविली, ही कथा सांगून शुक ह्मणाला कीं, हें चातुर्य तुजला असेल तर जावें असें श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा २२

याहिदेवि पुनर्याहि यदि गंतुं त्वदाग्रहः॥ यदि
वेत्स्युत्तरं कर्तुं यथा मुंडिकया कृतम्॥ १॥

अर्थ- हे प्रभावती! तुझा जाण्याचा आग्रह आहे तर जावें. परंतु जसें पूर्वीं मुंडिकनें आपले भर्त्यास उत्तर केलें तसें तूं जाणत अससील तर जावें.

दुसरे दिवशीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वीं एकपुर नगरांत बाई साटकी ह्मणून एक शेती होता, त्याची स्त्री मुंडिका होती, ती प्रति दिवसीं पतीस भोजन घेऊन शेतास जात असे. त्यावेळीं मार्गांत शूर पाळ नामें

येऊन तिचा उपभोग करीत असे. असें असतां एके समयीं मार्गांत तार टेऊन शूरपाळा बरोबर क्रीडा करूं लागली; हें तुळदेव नामा कोणी एक मार्गस्थ याणें पाहून समीप आला आणि मेलेला उंट पडला होता त्याचें मांस किंचित् त्या ताटामध्यें टाकून आच्छादन वस्त्र जसें होतें तसेंच घालून ठेविलें; नंतर मुंडिकेनें तें तार तसेंच नेऊन पती पुढें ठेविलें. त्याणें वस्त्र काढून पाहिलें तों दुर्गंधी येत आहे; नंतर स्त्रीस विच्यारिलें कीं, हें काय ? तेव्हां मुंडिकेनें हात जोडून भीत भीत उत्तर केलें कीं, पूर्व दिवसीं रात्रौ तुह्मांस उंटानें भक्षिलें. असें मी स्वप्नांत पाहिलें, आणि त्या विघ्नाचा परिहार व्हावा ह्मणून आज मार्गांत उंट मेलेला पाहून त्याचें मांस किंचित् पात्रांत घालून आणिलें आहे. याचा वास मात्र घ्यावा आणि टाकावें; असें ऐकून सारेका याणें आपल्यास विघ्न आलें होतें परंतु स्त्रीनें परिहार केला अशी कल्पना करून संतुष्ट जाहाला. आणि मांसाचा वास मात्र घेऊन टाकिलें. ही कथा श्रवण करून प्रभावती स्वगृहींच शयन करिती जाहाली.

कथा २३

व्रजदेवि मनो यत्र रमते पुरुषांतरे ॥ कुंट्टिण्याश्चरितं श्रुत्वा चातुर्यं त्वयि तादृशम् ॥ १ ॥

अर्थ- हे प्रभावती! ज्या अन्य पुरुषाचे ठाईं तुझें मन रमत असेल त्याकडे जावें, परंतु तुजला कुंटिणीचें वर्त्तमान सांगतों तें श्रवण करून त्या प्रमाणें तुजला चातुर्य असेल तर जावें.

दुसरे दिवशीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वीं पद्मावती नगरीचे ठाईं सुंदर सेन नामें राजा होता, त्याची स्त्री शृंगारसुंदरी. व पुत्र राम तो सकल विद्या व कला यांचे ठाईं निपुण जाहाला. नंतर माया नामें एक प्रसिद्ध कुंटीण नगरांत होती, तीस आणून सांगीतलें कीं, मी आपला पुत्र तुझे स्वाधीन करितों. त्यास स्त्रियांचे मायेची वंचना करावयाची उत्तम ज्ञानें सांगीतल्यास तुजला सहस्त्र मोहोरा देईन; आणी स्त्रियानीं त्याची वंचना केली तर तुज पासून दुप्पट घेईन; असें ससाक्ष बोलून पुत्र घेतला, आणि त्या कुंटिणीचे घरीं पाठविला; नंतर तिणें त्यास कित्ति एक वेश्यांचीं चरित्रें, व स्त्रियांचीं कपटें शिकविलीं, नंतर प्रतिज्ञा पूर्वक राजाचे स्वाधीन केला; सुंदर सेन याणें पुत्राची परीक्षा पाहावी ह्मणून लाख रुपयांचा जिन्नस पुत्रा बरोबर देऊन सावकारी करावयासाठीं पातरास पाठविला; तथें कमलावती नामें वेश्या राहात होती, तिज बरोबर एकवर्ष क्रीडा करावयास राहिला. तिणें त्याची वंचना करून द्रव्य घ्यावें ह्मणून अनेक उपाय

केले, परंतु द्रव्य हातास येईना; हें तिणें आपले मातेस सांगीतलें तेव्हां माता ह्मणाली कीं, हा देशांतरास जाऊं लागेल ते समयीं कपट करून द्रव्य घेऊं; तेव्हां कमलावतीनें विच्यारिलें कीं कपट काय करावें? मग माता ह्मणाली कीं, हा जाते समयीं तूं बहुत खेद करून ह्मणावें कीं, मी तुज बरोबर देशांतरास येतें, त्यास मला न्यावें; नाहींतर मी तुज पुढें प्राण त्यागीन, असें बोलावें आणि त्याज बराबर जाते समयीं, गांवा बाहेर विहीर आहे तींत उडी घातली ह्मणजे तो प्रसन्न होऊन तुजला द्रव्य देईल; मी विहिरी मध्यें पूर्वींच जाळें बांधून ठेवितें. असा निश्चय करून, राजा आपले देशीं जाऊं लागला, त्या समयीं कमलावतीनें तसेंच केलें तेव्हां राजपुत्र याणें प्रसन्न होऊन सर्वस्व तिजला दिल्हें. तें द्रव्य पदरीं पडतांच कमलावतीनें अपमान करून राजपुत्रास बाहेर घालविलें; मग श्री, मान, यांचा नाश जाहाला असतां आपल्या गांवा घेऊन घरीं आला; आणि झालेलें वर्त्तमान पित्यास प्रधान मुखें निवेदन करविलें, तें पित्यानें श्रवण करून पुत्राचें समाधान केलें. आणि धूर्त्तमायेस बोलाऊन आणून सांगीतलें कीं, तूं वेश्या चरित्र शिकविलेंस तथापि वेश्येच्ये घरीं कुंटणीनें सर्वस्व घेतलें ह्मणून कौतुकें करून दुत्तां

विटंबना न केली,असा पुरुष कोण आहे! स्त्री चरित्र अपूर्व आहे, वेश्येनें तुझे पुत्राची वंचना केली, हें सत्य आहे, परंतु हे पुनः पूर्ववत् जिन्नस नावेंत भरून मजला बरोबर देऊन पुत्रास तेथें पाठवणें.नंतर राजानें चमत्कार पाहावयास्तव दुप्पट जिन्नस व आपला पुत्र राम, यास धूर्त्तमायेचे स्वाधीन करून त्यास द्वीपांतरास पाठविला; तेथें गेल्यानंतर तो सर्व मित्रांस व कमलावतीस भेटला तिणें फिरून द्रव्य घेऊन आला हें पाहून, त्यास आपले घरीं मोठ्या नम्रतेनें बोलाविला; आणि आपण द्रव्य हरण करूं लागली. या प्रमाणें कित्येक दिवस गेल्या नंतर धूर्त्तमाया चांडाळिणीचें रूप घेऊन(आपला पुत्र कमळावती वेश्येस समागमें घेऊन शय्येवर बसला आहे अशा समयांत) पूर्व संकेता प्रमाणें दारीं गेली; ती आली असें पाहातांच राजपुत्र राम अकस्मात् पलंगावरून उठून रडूं लागला. हें पाहून कमळावतीही उठून उभी राहिली; आणि विचारिलें कीं, हें काय? तेव्हां तो ह्मणाला कीं, बाहेर आली आहे ही माझी माता, धूर्त्तमाया इचें नाव, मी घरांतील सर्व द्रव्य घेऊन बहूत दिवस पळून आलों होतों, यास्तव माझा शोध लावून आज तिणें मला पाहिलें; असें बोलून उगाच राहिला;

धूर्त्तमाया दूर उभी राहिली आणि पुत्रास बोलाऊन ह्मण ली कीं, बहुतां दिवशीं वेश्येचे घरीं सांपडलास; माझें सर्व स्व हरण करून वेश्येस ही चारविलीस; या प्रमाणें मोठ्या नें बोलूं लागली, तों राजपुत्र तोंडावर हात देऊन अकस्मा त बाहेर आला आणि धूर्त्तमायेचे पाय धरून भूमीवर पडला, हें पाहून कमलावती आपले कुंटिणीसह वर्त्तमान येऊन धूर्त्तमायेस घरांत नेली आणि विच्यारिलें की, हे मा ते! हा कोण? याची माता कोण? हें सांगावें मग धूर्त्तमाया ह्मणूं लागली कीं, पद्मावती नगरीचा राजा सुंदर सेन, त्या चे घरचे हलाल खोराची मी स्त्री, माझें नाव मातंगी. हा मा झा पुत्र माझें सर्व द्रव्य घेऊन येथें आला, त्याचा लोभ तूं धरिलास या गोष्टीची मी आत्तां क्षमा केली, परंतु तूं आ तां पुत्रा सहवर्त्तमान माझे घरीं चलावें, इतकें एकतांच कमलावती घाबरी होऊन, तिचे पाय धरून बोलली कीं, हें संपूर्ण द्रव्य घ्यावें आणि याचा बोभार न करावा. नंतर धूर्त्तमायेनें उत्तर केलें कीं, मी चोरून द्रव्य घेणार नाही. या अर्थी अनेक शपथा केल्या. तेव्हां वेश्या ह्मणाली कीं, मजला प्राण दान द्यावें, विटंबना न करावी. ऐसें बोलिली. त्यानंतर धूर्तमायेनें राजपुत्राचें द्रव्य दोन वेळ घेतलें होतें तें व तिचें तिज पासून घेतलें आणि पुत्रा सह वर्त्तमान

ठा उत्साह करविला; आणि वेश्येचें द्रव्य आणिलें होतें त्यांतून अर्धे धूर्त्तमायेस संतोषें करून राजानें दिधलें आणि तिचा बहुत सन्मान केला. ही कथा सांगून शुक ह्मणाला कीं, हें चातुर्य तुजला वतुस्या सख्यांत कोणास असेल तर परपुरुष समागम करावा. असें श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहली.

## कथा २४

याहिदेवि विजानासि यद्जारसमन्विता ॥
सज्जनीवत्पुनः कर्त्तुं भर्त्रा निजकचग्रहे ॥ १ ॥

अर्थ-हे प्रभावती! तूं परपुरुषाचे संगार्थ जात्येस तर जा, परंतु पूर्वीं सज्जनी नामे स्त्री होती, तिणें परपुरुष आणिला असतां तिचे भर्त्यानें पाहून तिचे केश धरिले; तिणें तें पाहून जसें कृत्य केलें तसें जाणत असलीस तर जावें.

दुसरे दिवसी प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं. पूर्वीं चंद्रपूर नगराचे ठाईं क्रूरपाळ नामें सुतार होता, त्याची स्त्री सज्जनी, देवळ नामा याज बरोबर व्यभिच्यार करीत असे; त्याचें कर्ज क्रूरपाळ याणें देणें होतें, असें असतां आपली स्त्री व्यभिच्यारिणी असें क्रूरपाळ याणें कर्णोपकर्णीं ऐकिलें. तेव्हां सत्य किंवा असत्य हें पाहावें ह्मणून पर -

ऊन स्त्रीस न कळतां सायंकाळीं घरीं येऊन पलंगाखालीं लपून राहिला. नंतर रात्रीं सज्जनीनें देवल यास बोलाऊन खोलीच्या दाराजवळ आली, इतक्यांत सरपाळ याणें देवला स पाहून अकस्मात पलंगाखालून निघाला. आणि स्त्री ची वेणी धरिली. नंतर सज्जनी देवलास पाहून बोलती जाहाली कीं, माझा पती परगावीं गेला आहे तो आल्याव र रुपये देईल; असे मी बोलत असतां तूं माझे पाठीमागू न आलास, त्यास ईश्वर सत्तेनें पतीही आला, आतां आ पले रुपये मागून घेणे, असें बोलून पाठीमागें फिरून स रपाळ यास ह्मणाली कीं, स्वामी! याचें काय देणें आहे तें आतां द्यावें, वारंवार इजत घेतो हें ठीक नाहीं असें ऐकून स रपाळ याणें वेणी सोडिली, आणि देवल यास कांहीं रुपये दे ऊन वाटेस लाविला. आणि आपणही संतोषें करून राहा ना झाला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहली.

## कथा २५

कुरुचेद्रोचतेभीरुयदिवेत्सिप्रतीपताम् ॥
सिद्धस्सपणकोयद्बद्बुद्धिपूर्वसमाचरेत् ॥ १ ॥

अर्थ-हे प्रभावती! तुजला जें गोड वाटेल तें कर. परंतु पूर्वी सिद्धसपणक याणें आपला प्रतिस्पर्धी याचें पारिपत्य

केलें तसें करावयास तुझे ठाईं बुद्धी असेल तर जा.

दुसरे दिवसीं प्रभावती मन रुक बोलत आहे कीं. पूर्वीं चंद्रपुरीचे ठाईं सिद्धक्षपणक नामें जैन राद्धांत होता; तो महा पंडित राजाश्रित; तेथें कांहीं दिवसें करून श्वेतांबर दुसरा नास्तीक आला, तो ही पंडीत, त्याणें सर्व जन वश्य केले, आणि राजा ही वश्य केला. तें कठीण वाटून सिद्धक्षपणक याणें सर्वांसि सांगीतलें कीं, आम्हीं ब्रह्मचर्यें करून असावें हा आमचा धर्म असतां हा श्वेतांबर वेश्यागमन करितो. असें बोलून एके वेश्येस द्रव्य देऊन श्वेतांबर याचे घरीं पाठविली. आणि आपण च्यार गावांतील श्रेष्ठ पुरुष बरोबर घेऊन सूर्योदया पूर्वीं पाहांटेस त्याचे घरीं गेला. तो श्वेतांबर नग्न होऊन कांहीं मंत्र साधन करीत होता. ते समयीं वेश्येनें जाऊन हात धरिला आणि बाहेर आणिला. हें लोकांनीं पाहून बोद्धांचें व्रत ब्रह्मचर्य असतां या श्वेतांबरानें अमर्यादा केली. हा भ्रष्ट झाला; असें त्यास बोलून नगरा बाहेर घालविला; नंतर सिद्धक्षपणक संतोषें करून राहाता जाहाला; ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा २६

याहि देवि स्वदोषघ्नं यद्‌ जानासि भाषितुं॥

याचा अर्थ- हे प्रभावती! आपले दोषाचा नाश होईल, असें भाषण करावयास जाणत अससील तर जा, परंतु जसें पूर्वी रत्नदेवीने, एके समयीं दोन जार उपभोगार्थ आपले गृहीं आले असतां तिणें आपले पतीस जसें भाषण केलें. तसें तूं करावयास जाणत असलीस तर जा. एतद्विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

दुसरे दिवशीं प्रभावतीस शुक बोलत आहे कीं, पूर्वी जलोद नामें नगरांत क्षेमराज नामें राजपुत्र राहात होता; त्याची स्त्री रत्नदेवी सुंदर व व्यभिच्चारिणी होती, ती देवराज नामें ग्रामाधिपती, त्याचा पुत्र धवलाक्ष या उभयतां बरोबर क्रीडा करीत असे, असें असतां एके दिवशीं रत्नदेवीचा भ्रतार बाहेर गेला असतां, प्रथम धवलाक्ष आला; मागाहून अर्धघटिकेचे अवकाशें त्याचा पिता देवराज तोही भोगार्थ आला. तेव्हां रत्नदेवीनें धवलाक्ष, यास लपवून देवराज याज बराबर क्रीडा करूं लागली; इतक्यांत रत्नदेवीचा पती बाहेरून घरीं आला; त्या समयीं रत्नदेवी देवराज याजवर क्रोधायमान होऊन म्हणते कीं, येथें कोणास शोधितोस? आमचे घरीं कोणी आला नाहीं असें बोलून देवराजास हातीं धरून बाहेर

याजवर क्रोध किमर्थ केलास. मग तिणें धवलाक्ष यास बाहेर काढून पतीस दाखविला आणि एकांतीं बोलिली कीं, याचे बराबर कलह होऊन बाप मारील या भयानें हा धवलाक्ष आपले घरीं आला, तो मी लपवून ठेविला होता त्याचे शोधास देवराज आला. यास्तव, मी त्यास रागें भरून बाहेर घालविला. असें एकीकडे बोलून धवलाक्ष यास ही आपले घरीं जावें असें सांगून आपल्या घरांतून घालविती जाहाली. नंतर क्षेमराज यास बहुत संतोष जाहाला, ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहली.

## कथा २७

रंभोरुगच्छकामंत्वंनतेविघ्नंकरोम्यहम् ॥
मोहिनीवसमर्थाचेज्जारगोपनकर्मणि ॥ १ ॥

अर्थ- हे प्रभावती! तूं परपुरुषभोगार्थ जात्येस तर जा, मी तुझे कार्यास विघ्न करीत नाहीं, परंतु मोहिनी सारिखें जाराचें रक्षण करावें. असें तुझे ठाईं सामर्थ्य असेल तर जा. एतद्विषयीं तुला कथा सांगतों ती श्रवण कर.

दुसरे दिवशीं प्रभावतीस शुक बोलत आहे कीं, पूर्वी शंकरपूर गावीं अहि नामें वाणी राहात होता; त्याची स्त्री मोहिनी, ती कुमूरर्व धूर्त याजबरोबर क्रीडा करीत असे

धरून आपले समीप बाळगीत असे; या प्रमाणें असतां मोहिनीनें कुमूर्ख धूर्त्त यास सांगून संकेत केला. आणि आपण रात्रौ पलंगावरून खालीं उतरून निजली. त्या समयीं धूर्त्त ही येऊन तिज बराबर क्रीडा करूं लागला. त्या समयांत अही याणी जागा होऊन शीघ्र धूर्त्ताचें शिश्न धरिता जाहाला. आणि स्त्रीस ह्मणाला कीं, सत्वर उठून दिवा लावावा. मी चोर धरिला आहे. हें ऐकून मोहिनी ह्मणाली कीं, आंधारांतून जावयास मी भय पावत्यें. तर मी चोरा समारित्यें. तुह्मीं शीघ्र बाहेर जाऊन दिवा लावावा. या प्रमाणें बोलिली. त्यानंतर अही याणें चोर तिचे हातीं देऊन, आपण दिवा लावून आणावा ह्मणून गेला इकडे तिणें कुमूर्ख धूर्त्त यास बाहेर घालवून, पलंगा समीप गाईचें वासरूं आणिलें आणि त्याची जीभ धरून आपण निजली. त्या समयीं अही याणी हातांत काठी घेऊन दिवा आणून पाहिलें तों गाईचें वत्स; त्याची जीभ धरून स्त्री निजली आहे; नंतर तिजला जागी करून विच्यारिलें कीं, हें काय? तेव्हां तिणें सांगीतलें कीं, तुह्मी माझे हातीं काय दिल्हें तें धरून भयास्तव डोळे झांकून निजल्यें होत्यें, परंतु हें आपले गाईचें वत्स, त्यास क्षुधा लागली ह्मणून

पुढें येऊन माझी मांडी चाटिली; तेव्हा कळ पडली ती म ला निद्रेच्या योगें समजली नाहीं असें बोलून वस्त्र सोडिलें आणि पतीची निर्भर्त्सना केली; तोही लज्जित होऊन निजता जाहाला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा २८

कृशोदरि प्रयाहि त्वं कर्त्तुं जानासि वा यदि ॥
जरसे भर्त्तरि पूर्वं यथा देविकया कृतम् ॥ १ ॥

अर्थ- हे प्रभावती ! तूं परपुरुष संमार्थ जात्येस तर जा, परंतु पूर्वीं देविकेनें आपला भ्रतार जरस याला जसें केलें, तसें संकट काल प्राप्त जाहाला असतां करावयास जाणत असलीस तर जावें.

दुसरे दिवशीं प्रभावतीस शुक बोलत आहे कीं, पूर्वीं कुडाक्ष ग्रामाचे ठाईं जरस कुटुंबी राहात होता. तो महा मूर्ख त्याची स्त्री देविका व्यभिचारिणी ती प्रभाकर ब्राह्म णा बरोबर बिभव्याचे वृक्षाखालीं व्यभिच्यार करीत अ से, हें वर्त्तमान जरस याणें कर्णोपकर्णीं ऐकून तें सत्य किं वा मिथ्या हें पाहावें यास्तव एके दिवसी बिभव्याचे झा डावर जाऊन बसला. तों देविकेनें वृक्षाखालीं प्रभाकरा स आणून व्यभिच्यार करिती जाहाली. नंतर प्रभाकर याणें तिचा पती झाडावर बसला हें पाहून दूर गेला.

आणि एका झाडाखालीं लपून बसला; इकडे जरस देवि केचा पती खाली उतरून त्यास ह्मणाला कीं, बहुत दिवस तुरुकीत होतीस, परंतु आज कुकर्मांत सांपडलीस, तूं दुसऱ्या पुरुषा बराबर नित्य येऊन हें कर्म करित्येस तर आज या गोष्टी विषयीं तुझें पारिपत्य करितों. तेव्हां देविकेनें उत्तर केलें कीं मी तर कुकर्म केलें नाहीं. शेतास जातानां वारेस उष्ण लागलें ह्मणून येथें क्षण मात्र बसल्यें, असें असतां तुह्मांस विपरीत भासलें; तस्मात् या वृक्षाचा काहीं गुण आहे. तेव्हां जरस ह्मणाला कीं, आतां मी खाली बसतों, तूं वर जाऊन पहा, तेव्हां देविका झाडावर चढून बसली आणि खालीं भर्त्याकडे पाहून ह्मणाली कीं, बहुत दिवस मज पाशीं प्रतिज्ञा करीत होतां. परंतु दुसरे स्त्री जवळ गेलां हीतुंमची चोरी आज सांपडली. असें बोलून जरसावर क्रोध करिती जाहाली. तेव्हां जरस आपले ठिकाणीं लज्जित होऊन तिचें समाधान करिता जाहला. आणि तिला घेऊन घरासजाता झाला; ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा २९

यजदेविपरंजारंकर्त्तुंजानासिचेत्तथा ॥ निजजारस्यगुप्त्यर्थंयथास्कंदरिणाकृतम् ॥ १ ॥

अर्थ-हे प्रभावती! पूर्वी सुंदरीनें आपले जाराचें, संकट समयीं जसें रक्षण केलें तसें रक्षण करावयास जाणत असलीस तर जा. ज्या पुरुषा कडे तुझें अंतःकरण रमत असेल त्याजकडे जाण्या विषयीं कथा सांगतों श्रवण कर.

दुसरे दिवशीं प्रभावतीस शुक बोलत आहे कीं, पूर्वी शिहू ग्रामी महाधन नामें सावकार राहात होता, त्याची स्त्री सुंदरी ती मोहन धूर्त याज बराबर व्यभिच्यार करीत असे तेव्हां एके दिवसीं मोहन आला. इतक्यात महाधन ही ग्रामाहून येतो हें सुंदरीने पाहिलें मग मोहनास शिक्यांत नग्न बसविलें, शिकें माडीस लोंबत ठेविलें आणि आपण त्वरेनें बाहेर येऊन महाधनास ह्मणाली कीं, स्वामी नागवें भूत येऊन शिक्यांत बसलें आहे, त्यास कोणी भूत वैद्यास सत्वर आणावा; हें महाधन याणें ऐकून विच्यार न करितां भूत वैद्याच्या घरास गेला; इतक्यात सुंदरीनें मोहनास खालीं उतरून बाहेर घालविला. आणि महाधन भूतवैद्य घेऊन आला त्यास ह्मणाली कीं, तुह्मीं यावयाचे पूर्वीच भूत पळोन गेलें. नंतर भूतवैद्य आपले घरास गेला आणि महाधन वैद्याची स्तुती करून संतुष्ट जाहला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहली.

कथा ३०

यथा देवात्स समुत्तरं मूळदेववत् ॥ १ ॥

अर्थ- हे प्रभावती! तुजला कुकर्म करावया विषयीं माझें मत नाहीं. परंतु तूं संकट काळीं मूळदेवा सारिखें भाषण करून मुक्त व्हावें असें जाणत असशील तर जावें. या विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

पूर्वी भयंकर श्मशानाचे ठाईं कसल्क व वेताळ असीं दोन पिशाच्चें राहात होतीं, त्यांस धूम्रप्रभा व मेघप्रभा त्या दोन स्त्रिया अकस्मात् प्राप्त जाहाल्या. नंतर भूतांचा परस्परें त्या स्त्रियां विषयीं कलह होऊं लागला. इतक्यांत मूळदेव ब्राह्मण त्या मार्गानें जात होता, त्या समीप जाऊन त्यास विच्यारिलें कीं, त्या दोन स्त्रिया आहेत यातून आह्मांस उभयतांतून कोणास कोणती योग्य आहे हें, यथार्थ सांगावें, तेव्हां ब्राह्मण सत्यवादी, सुशील परंतु समय विपरीत जाणून सांगीतलें कीं ज्याच्या चित्तास जी चांगली भासेल ती त्याणें घ्यावी. असें बोलून ब्राह्मण पिशाच्याचे हातून मुक्त होऊन स्वगृहाप्रत जाता जाहाला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

कथा ३१

यथेच्छं व्रज कल्याणि यत्रेच्छसि कृशोदरि॥

शशकस्यवनेबुद्धिरस्तिचेदात्मरक्षणे ॥ १ ॥

अर्थ- हे प्रभावती! ज्या ठिकाणीं जावयाची तुझी इच्छा असेल त्या ठिकाणीं जा, परंतु पूर्वी अरण्या मध्ये आपलें रक्षण करावें एतदर्थ ससा जसें जाणत होता, तसी बुद्धी तुझे ठाईं असेल तर जावें.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी मधुर वनाचे ठाईं पिंगल नामें सिंह राहात होता, तो अरण्यांतील पशू मारूं लागला. तेव्हां त्याणीं सिंहा समीप जाऊन नेम केला कीं, प्रति दिवसी एक पशू देत जाऊं आणि तूं सर्वांचें रक्षण करावें. तें सिंहानें मान्य केलें. नंतर एके दिवसीं सशाची पाळी आली तेव्हां ससा याणें विच्यार करून प्रातः काळीं जावयाचा नेम टाकून मध्याह्न काळीं भीत भीत गेला त्यास सिंहानें विच्यारिलें कीं, तुला विलंब कां लागला? या उपर मी क्षमा करणार नाहीं, ससा ह्मणाला कीं, स्वामी! हा अपराध मजकडे तिळमात्र नाहीं, आह्मी पांच ससे तुमचे नेमा प्रमाणें येत असतां मार्गीं दुसरा सिंह आला त्यास आह्मी तुमची द्वाही दिल्ही असतां च्यार ससे भक्षिले, मी मात्र पळून स्वामीस वर्तमान सांगावयास आलों. त्यास या गोष्टीचा विच्यार न केल्यास दोघांचा निर्वाह आह्मीं गरीबानीं कोठून करावा? हें श्रवण

ष्टी वनचरें भक्षितो, हें ठीक दिसत नाहीं, तर आधीं सिंहा
चें पारिपत्य करीन; मग भोजन होईल. त्यास सिंह कोठे
आहे तो दाखवणें. नंतर ससा याणें एक खोल आड पाहून
तेथें सिंहास नेऊन दाखविला आणि ह्मणाला कीं; आतां
न आपले भयें करून विहिरींत गेला. मग सिंहानें आडां
त आपलें प्रतिबिंब पाहून दुसरा सिंह आहे असें मानून स
क्रोध जाहाला, आणि त्यास मारावयास आडांत उडी टाकिली,
आणि मृत्यु पावला. ही गोष्ट ऐकून वनचरांस समाधान जा
हालें आणि परम संतोषें करून राहिलीं. ही कथा श्रवण
करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ३२

याहिदेविमनोयत्ररमतेकमलानने ॥रा
जिनीवविजानासिवक्तुंधूलिप्रदर्शने ॥१॥

अर्थ-हे प्रभावती! तुझें मन ज्या ठिकाणीं रमत असेल
तेथें जा; परंतु पूर्वीं राजिकेने आपले सासूस धूळ दाखवू
न जसें उत्तर केलें, तसें करावयाचें चातुर्य तुजला असेल
तर जा. या विषयीं कथा सांगतों ऐक.

दुसरे दिवसीं प्रभावतीप्रत शुक बोलत आहे कीं, पू
र्वीं शांतपुरीचे ठाईं केशव शेट वाणी राहात होता, त्याची

स्त्री मोहिनी, पुत्र सोमक, आणि पुत्रस्त्री राजिनी परम सुंदर परंतु व्यभिच्यारिणी. असें असतां एके समयीं तिची सासू मोहिनी इणें काहीं द्रव्य देऊन गहूं आणावयाकरितां राजिनीस बाजारांत पाठविली. तिणें बाजारांत गहूं घेऊन येते समयीं परपुरुष पाहिला, त्याज बरोबर संकेत करून गहूं वाण्याचे दुकाना पुढें बाजारांत ठेऊन आपण संकेता प्रमाणें त्या स्थळीं जाऊन क्रीडा करिती जाहली. त्या समयांत वाणी याणें मोटेंतील गहूं घेऊन त्यांत धूळ बांधून ठेविली. राजिनीनें दोन घटिका क्रीडा करून, घाबरे पणें येऊन तशीच मातीची मोट उचलून घेतली. नंतर सासूनें मोट सोडून गहूं पाहूं लागली तों धूळ पाहिली. तेव्हां राजिनीनें हात जोडून सांगीतलें कीं, बाजाराचे रस्त्यांत माझे हातून पैका खालीं पडला. त्याचा शोध करावयास्तव ही माती जमा करून आणिली आहे. मग मोहिनीनें पैसा हरपला हें पाहून खिन्न होऊन उगीच राहिली. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा २३

कोदोषोगमनाद्देविवेत्सिचेत्कर्त्तुमुत्तरम् ॥
अतीवजारिणीयद्वद्रंभिकापतिसन्निधौ ॥ १ ॥

अर्थ-हे प्रभावती! तूं गेलीस तर काय दोष आहे! सरवें क

रूनजा. परंतु पूर्वी आपल्या पति सन्निध रंभिकेनें जसें उत्त र केलें तसें संकट समयीं तूं उत्तर करावयास जाणत अ सशील तर जा. या विषयीं कथा सांगतो श्रवण कर.

दुसरे दिवशीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी शंकरपुराचे गांईं शंकर माळी भाग्यवंत राहात होता; त्या ची स्त्री रंभिका अति व्यभिच्यारिणी असे. एकदां श्राद्ध दिवसीं रंभिकेनें आपले उपपती च्यार परस्परें नकळतां भोजनास बोलाविले, आणि शंकर याणें आपले जातीचे च्यार माळी बोलाविले. इकडे उपपती मध्यें प्रथम वाणी भोजनास आला, त्यानें अर्ध स्नान होते समयीं सुतार येता झाला, तेव्हां वाणी यास वेळूची खोली बहूत जुनी होती त्यांत लपवून ठेविला. नंतर सुतार स्नान करितो इत- क्यांत तरळ नामा तिसरा आला, तेव्हां सुतारही वाणी या चे खोलींत लपविला, नंतर तरळ स्नान करीत आहे इतक्यां त बलाधिप चवथा आला. तेव्हां तरळास भांड्यांची खो- ली होती तेथें ठेविला. बलाधिप याचे स्नानाचे संधीस च्या र माळी घेऊन शंकर येता जाहाला. तेव्हा बलाधिपास ने ऊन तिघे जेथे लपविले होते त्या खोलीवर वेळूची माडी होती तेथें बसविला. तों इकडे सायंकाळ जाहाला तेव्हां रंभिकेनें त्वरा करून माळी यास भोजनास देऊन, चवघे

आपले उपपती होते त्यांस पृथक् पृथक् अन्न नेऊन देती जाहाली सर्व भोजनास बसले इतक्यात वाणी याणें क्षीर उष्ण लागली ह्मणून फूत्कार केला, तेव्हा सूतार व तरळ यांस सर्प आला असें भासून आपलीं तारें मस्तकावर घेऊन उभे राहिले ते समयीं माडीस तारें लागून वेळू हालले; नंतर माडीवर बलाधिप होता, त्यास कोणी तरीं धरावयास आले हा भाव उत्पन्न होऊन धांव मारून माडी खालीं उडी टाकिली. तों माडी पडों लागली ह्मणोन वाणी, सूतार, व तरळ असे तिघे ही खोलीतून बाहेर पडून पळाले; आणि चवघे ही आपापले घरास गेले. इकडे काय गडबड आहे ह्मणून शंकर भोजन करीत होता तो मंडळी सहवर्त्तमान भोजन टाकून उठला. आणि बाहेर पाहिलें तों आंधेरांत कांही दिसलें नाहीं. मग शंकर याणें स्त्रीस विच्यारिलें कीं, कोण बाहेर गेल्या सारिखें दिसलें हें काय ? ते समयी रंभिकेनें उत्तर केलें कीं, स्वामी ! आज तुह्मीं भोजनास सायंकाळ केलात, तेव्हां कालातिक्रम जाहाला व भक्ती हीन श्राद्ध केलें यास्तव क्रोधें करून, तुमचे वडील श्राद्धास आले होते ते विमुख होऊन उपोषित गेले; नाहीं तर आपले खोलींतून कोण बाहेर निघणार ! तस्मात् पुनः उदयीक श्राद्ध करावें, हें शंकर याणें सत्य मानून

दुसरे दिवसीं श्राद्ध केलें. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ३४

याहिदेविगतेवेत्सियदिभामिनिभाषितुम् ॥
कुमार्येस्विपटंदत्वायथोक्तंशम्भुनापुरा ॥ १ ॥

अर्थ- हे प्रभावती! तूं परपुरुष संगार्थ जात्येस तर जा. परंतु पूर्वी अरण्याचे ठाईं शेत राखणारी स्त्री होती तिणें शंभु नामा ब्राह्मण याचें वस्त्र घेतलें असतां, त्याणें जसें चातुर्यानें भाषण करून परत घेतलें तसें समयीं भाषण करावयास जाणत अससील तर जा. या विषयीं कथा सांगतों श्रवण कर-

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, कोणी एके नगरीं शंभु नामा ब्राह्मण द्यूत प्रिय राहात होता. तो एके दिवसीं ग्रामांतरास जात होता. तों मार्गांत शेताचे बांधावर शेत रक्षावयास एक स्त्री बसली होती, तिजला पाहून समीप आला, आणि तिजला तांबूल देऊन तिशीं उपभोग केला; नंतर तिणें त्याचें वस्त्र घेतलें, तें मागावयास लागला, तेव्हा तिणें वस्त्र न देतां घरास जाऊं लागली. नंतर शंभू याणें शेतांतील जोंधळ्याचीं कणसें घेऊन मागें लागला आणि गांवचे लोकांस ह्मणाला कीं, पांच कणसें मी घेतलीं यास्तव इणें माझें वस्त्र पांच रुपयाचें घतलें हा

तुमचे गावचा न्याय कीं काय ? नंतर सर्वांनीं तिजकडून वस्त्र ब्राह्मणास देवविलें. नंतर तिणें लज्जेस्तव पूर्व वृत्तांत न सांगतां वस्त्र दिल्हें. आणि ब्राह्मण वस्त्र घेऊन घरास आला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ३५

गच्छदेविनतेदोषोयदितत्रगतासति॥स्वार्थंकर्त्तुंविजानासितिलक्रयकरोयथा॥ १॥

अर्थ–हे प्रभावती! पूर्वी सांब नामा वाणी याणें आपले स्वार्था करितां जसें चातुर्य केलें.तसें करावयास तूं जाणत अससील तर जा. या विषयीं कथा सांगतों श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी कोणी एक सांब नामें वाणी तिळ खरेदी करावया करितां ग्रामांतरास जाऊन तेथें भांडशालिक वाणी याज पाशीं विचारिलें. त्याणें तीळ लागतील ते देतों असें बोलून सांब वाणी यास आपले घरीं भोजनास नेलें त्याणें भांडशालिक याची स्त्री सुंदर पाहून तिला आपली हिऱ्याची आंगठी देऊन भोग करिता जाहाला. नंतर बाहेर येऊन भांडशालिक पास ह्मणाला कीं, आह्मास शंभर खंडी तीळ द्यावयाचा करार केला आहे, ते द्यावे. नंतर भांडशालिक ह्मणाला. करार कोणी केला ? तेव्हां सांब वाणी बोलिला

की, पूर्वी शंभर खंडीचा निश्चय करून तुझे स्त्रीनें माझे हातांतील आंगठी घेतली असतां तीळ द्यावयास विवाद करितोस हें सावकारास उचित नाहीं. तेव्हां भांडशालिकानें पुत्रास आपले स्त्री कडे पाठवून आंगठी आणविली आणि स्त्रीस ह्मणाला कीं, आ ह्मास न कळतां व्यवहाराचा निश्चय करित्येस येणें करून स्वार्थ होणार नाहीं, असें बोलून सांब वाणी यास आंगठी व करारा प्रमाणें तीळ देता झाला. ही कथा सांगून शुक ह्मणाला कीं, हें चातुर्य तुजला असेल तर स्वरवें करून जावें. असें ऐकून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ३६

त्वयास्वरवेनगंतव्यंतंजारंप्रतिसत्वरम् ॥
जानासिजयंतीवयद्विवक्तुंसदुत्तरम् ॥१॥

अर्थ– हे प्रभावती! तुझे मनांत जाराकडे जावें असें आहे तर जयंती सारिखें उत्तम प्रकारचें भाषण करावयास जाणत अससील तर स्वरवें करून सत्वर जा. या विषयीं कथा सांगतों श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी सरड गावीं शूरपाळ पाटील राहात होता त्याची स्त्री जयंती नित्य आपल्यास पीतांबराची चोळी मागत असे तेव्हां शू

रपाळ ह्मणाला कीं, पीतांबर ह्मणजे काय, हें आमचे घरीं कोणाला ठाऊक नाहीं तर त्याची कंचुकी कोठून द्यावी ? असें बोलून नंतर दुसरे दिवसीं शूरपाळ, गांवकरी यांचे मंडळींत जाते समयीं जयंतीनें सभेंत जाऊन शूरपाळ यास बोलिली कीं, आपले घरीं शिजली नाशिजली आंबील आहे ती भक्षावयास चलावें. हें शूरपाळ याणें ऐकून घरीं येऊन स्त्रीस ह्मणाला कीं, चौघांत येऊन तूं काय बोलिलीस? येणें करून मजला लघुत्व प्राप्त जाहलें; तर मी तुला पीतांबराची चोळी देतों परंतु बोलली आहेस तें असत्य करावें असें बोलून तिजला कंचुकी देता झाला. तेव्हां तिणें सांगीतलें कीं, उदईक मी येऊन हेंच वचन बोलेन त्यावेळीं तुह्मी गांवकरी जवळ बसले असतील त्यास घरीं घेऊन यावें, नंतर शूरपाळ याणें दुसरे दिवसीं तसेंच केलें. तेव्हां जयंतीनें जेवणाचें साहित्य उत्तम करून प्रकारा सहित गांवकरी यांस जेवावयास उत्तम वाढिलें तें सर्वांनी पाहून ह्मणाले कीं, हीस्वभावें करून उद्धट आहे याजकरितां शूरपाळ यास मनस्वी बोलत्ये परंतु कर्तृत्व चांगलें आहे; असें ऐकून शूरपाळ संतोष पावला. असी कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ३७

यथैं ध्वजकल्याणिनतेदोषोस्तिकश्चन ॥

लांगळीवाक्जिानासियदिकर्त्तुंत्वमुत्तरम् ॥१॥

अर्थ- हे प्रभावती! तूं स्वस्थपणें जा, गेलीस तर काय दोष आहे? परंतु पूर्वी लांगळीनें आपल्या शेतांतील सर्कती यास भाषण करून आपले पतीचें समाधान केलें तसें उत्तर करावयास जाणत असलीस तर जा. या विषयीं कथा सांगतों श्रवण कर.

दुसरे दिवशीं प्रभावतीप्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी संगम गावीं एक कुटुंबी दुर्बळ राहात होता. त्याचे शेताचा सर्कती तर्पणशाली, तो शेताची चांगली व्यवस्था करीत असे; त्यास भोजनास शरपतीची स्त्री लांगळी नामें घेऊन जात असे. तेथें भोजना नंतर दोघांचा संगही होऊं लागला. हें वर्त्तमान शरपतीनें ऐकून पाहावया करितां स्त्रीस नकळतां तो दुसरे शेतांत दूर जाऊन लपून बसला. त्याचे पूर्वी उभयतांचा संग जाहाला, नंतर शिरपतीनें पाहिलें व त्यासही लांगळीनें पाहून तर्पणशाली याजवर रागें भरून ह्मणाली कीं, शेतांत नागर चालवीत नाहीस परंतु हें मी पतीस सांगेन, तेव्हां तो तर्पणशाळी ही समजून ह्मणाला कीं, नागर मी धरावा आणि शेताचें काम करावें, आणि तुझे पतीस अर्धा वांटा द्यावा असी सरकत मजला पुरवत नाहीं तूं आपले पतीस सांग. हें शिरपतीनें ऐकून

विच्यार केला कीं, याउभयतांचे कलहानें भाषण होतआहे तेव्हां समागम कसा घडेल. तस्मात् व्यभिच्यारा विषयीं ऐकिलें तें असत्य.असें मानून घरास गेला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ३८

यत्रेच्छसिततोगच्छविप्रस्येवप्रभावति ॥
स्वहितंकुर्वतोदेविकोविघ्नंकर्त्तुमर्हति ॥ १ ॥

अर्थ- हे प्रभावती! तुझी इच्छा ज्या ठिकाणीं जावें असी असेल त्या ठिकाणीं जा. तुजला कोणी विघ्न करणार नाही. परंतु पूर्वीं प्रियंवद नामें ब्राह्मण याणें जसें आपलें स्वहित केलें तसें करावयास जाणत असलीस तर जा. या विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

दुसरे दिवसी प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वीं प्रियंवदनामें एक ब्राह्मण मार्गस्थ जात असतां एक गोविंदशेन वाणी राहात होता; त्याचे घरी रात्रौ रहावयास गेला; त्याची स्त्री सुंदर व व्यभिच्यारिणी होती; तिज बरोबर प्रियंवदानें भोग करावयास्तव आपली आंगठी दिधली; आणि भोग जाहाल्यावर आंगठी मागूं लागला. तों सुंदरी देईना; यास्तव तसाच उठून मोडकी खाट होती तिजवर येऊन निजला. आणि पाहाटेस एक खाटेचा

पाय मोडून घेऊन वाण्याजवळ आला आणि ह्मणाला कीं, हा खाटेचा पाय मी मोडला ह्मणून माझी आंगठी उंशाकडे पिर्श्वांत होती ती तुझे स्त्रीनें घेतली. आणि आतां देत नाहीं हा धर्म कीं काय? असें वचन वाण्यानें ऐकून आपले स्त्रीवर रागें भरून आंगठी देवविली. तिणें लज्जेस्तव कांहीं न बोलतां आंगठी ब्राह्मणास दिल्ही. ती घेऊन ब्राह्मण घरास गेला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ३९

याहिदेविपरंजारंकुरुवाञ्छितमादरात् ॥ यदिवक्तुंविजानासितुलाहद्भूधरोयथा ॥१॥

अर्थ—हे प्रभावती! तूं परपुरुषाकडे प्रीती करून आपलें इच्छित कर्म कर. परंतु पूर्वी आपलें हरण करणारा तुलाहत् यास भूधर याणें जसें भाषण केलें, तसें तूं जाणत असलीस तर जा. या विषयीं कथा सांगतों श्रवण कर.

दुसरे दिवशीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी कुंदिणी पुरींत भूधर वाणी राहात होता. तो पुण्य क्षयें करून दरिद्री होऊन, देशांतरास गेला. जाते समयीं शेजारी वाण्याचे घरी लोखंडी धट ठेऊन गेला. पुनः कांहीं दिवसीं द्रव्य साधन करून आला, तेव्हां शेजारी याजवळ धट मागूं लागला. तेव्हां त्याणें उत्तर केलें कीं, तुझा लोखंडी धट

उंदिरानें भक्षिला. नंतर प्रतरणेची गोष्ट भूधरानें ऐकून शे जाऱ्याचा पुत्र भोजनार्थ आपले घरीं नेऊन लपविला. नंतर शेजारी शोधास आला. तेव्हां त्यास सांगीतलें कीं, तुझा पुत्र गिधड याणें नेला. हें ऐकून शेजारी याणें राजद्वारीं जाऊन फिर्याद केली. ते समयीं राजाधिकारी याणें भूध रास आणून विच्यारिलें, तेव्हां भूधरानें उत्तर केलें कीं, महाराज! लोखंडी धट उंदिरानें भक्षिलें हें खरें तर गि धड हत्तीस नेतील. मग मुलगा नेतील यांत आश्चर्य का य? हें ऐकून शेजाऱ्यास, न्यायकर्ते याणीं फजित क रून, लोखंडी धट भूधरास देवविला. आणि भूधरा पासून शेजारी यास पुत्र देवविला. ही कथा सांगून शु क ह्मणाला कीं, हें चातुर्य तुजला असेल तर जावें. अ सें भाषण श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ४०

गच्छत्वं कुरु चाभीष्टं नांतरायं करोम्यहम्॥
स्कबुद्धिरिवचेद्वक्तुं विजानासि स्वकार्यतः॥ १॥

अर्थ — हे प्रभावती! आपले कार्यास्तव स्कबुद्धी सा रिखें भाषण करावयास जाणत असलीस तर आपले मनोरथ पूर्ण करावयास जा; मी तुजवर क्रोध करीत नाहीं परंतु एतद्विषईं कथा सांगतों ऐक.

दुसरे दिवसीं प्रभावतीस शुक बोलत आहे कीं, पूर्वी एके नगरांत सुबुद्धी व कुबुद्धी असे दोघे राहात होते त्यांतून सुबुद्धी देशांतरास गेला. व कुबुद्धी त्याचे स्त्री बरोबर कुकर्म आचरूं लागला. काहीं दिवसीं सुबुद्धी द्रव्य संपादन करून घरीं आला नंतर कुबुद्धीनें कपट भाव दाखविला. आणि विचारिलें कीं, तूं काय आश्चर्य पाहिलेंस ? मग सुबुद्धी ह्मणाला कीं, सरस्वती नदीचे तीरीं एके आडांत आंब्याचे झाडावर अकाळीं एक आंबा पाहिला. मग कुबुद्धी ह्मणाला कीं, हें असत्य आहे. या विषयीं तुझी व माझी प्रतिज्ञा. जर हें सत्य आहे तर तूं माझे घरीं येऊन, दोहातीं जें नेतां येईल तें न्यावें. आणि असत्य जाहाल्यास मी नेईन मग रात्रीं कुबुद्धीनें जाऊन आंबा होता तो काढून घेतला. नंतर दुसरे दिवसीं दोघे जण पाहावयास गेले. तेथे सुबुद्धीनें पाहिलें तों आंबा नाहीं. नंतर कुबुद्धी ह्मणाला कीं, आतां काय करावें. तेव्हां सुबुद्धी यास त्याचा भाव समजला. कीं, कुबुद्धीचे प्राणा गेईं कुबुद्धीचा लोभ आहे. मग सुबुद्धीनें घरीं येऊन त्वरेनें आपली स्त्री व वस्तभाव घरांतून काढून दुसरे ठिकाणीं नेऊन ठेविले. आणि कुबुद्धीस आपून, चोघांचे विद्यमानें आपली प्रतिज्ञा सांगता

ह्मणा. तेव्हां कुबुद्धी स्त्री लोभें करून घरांत गेला तों स्त्री नाहीं. मग माडीवर असेल ह्मणून चढावया करितां शिडी दोहों हाती घेतली. तेव्हां सुबुद्धी ह्मणाला कीं. प्रतिज्ञा सिद्ध जाहली. आतां शिडी घेऊन जावें. नंतर कुबुद्धी सखेद होऊन घरा बाहेर आला; त्या समयीं सर्वजनानीं त्याचा धिःकार केला. नंतर तो आपले घरास गेला. ही कथा ऐकून प्रभावती शयन करिती जाहली.

## कथा ४१

युक्तंतेगमनंदेवियदितत्रगतासति॥ संकटेवेत्सितंवक्तुंकश्चिद्द्विप्रवरोयथा॥ १॥

अर्थ- हे प्रभावती! तुझें जाणें फार चांगलें आहे. परंतु तूं गेलीस तर पूर्वी कोणी एक श्रेष्ठ विप्र याणें संकट काळीं जसें भाषण केलें तसें करावयास तूं जाणत असलीस तर जा. एतद्विषयीं कथा सांगतों ती ऐक.

दुसरे दिवशीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं; पूर्वी पंचपुराचे ठाईं शत्रुमर्दन ह्मणून राजा होता त्याची कन्या मदनलतिका, तीस मदन व्यथा होऊन कंठ दग्ध जाहाला. तेव्हा वैद्यास औषधास्तव राजानें दौंडी पिटविली कीं, कन्येस जो बरें करील त्यास दरिद्र रहित करीन; मग हे वृत्त एके स्त्रीनें ऐकून आपले पतीस निवेदि

लें, तें त्याणें ऐकून राजगृहीं गेला आणि कन्येस पाहून, पिशाच्याचा उपद्रव आहे ह्मणून सांगीतलें; नंतर मंत्रें करून बरी करावयास मंडळ करून पूजेचा स्वटाटोप बहुत केला. आणि परीक्षा पाहिली. तेव्हां ती मदन पीडेनें व्याप्त आहे असें पाहून मनःस्वी मंत्राची गडबड दोन घटिका पर्यंत मोठ्यानें बोलिला. तें पाहून मदन लतिका विस्मय होऊन हँसली. हँसावयाचे वेगें करून गल ग्रंथी फुटली, आणि राज कन्या स्वस्थ जाहाली. नंतर तो ब्राह्मण राजानें दरिद्र रहित केला. ही कथा ऐकून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ४२

स्वस्वेनयाहिभोगायजारंसर्वंगसुंदरि ॥ वेत्सिचेद्व्याघ्रमारीवशार्दूलेवक्तुमद्भुतम् ॥ १ ॥

अर्थ- हे प्रभावती ! तूं जाराकडे भोगार्थ स्वस्वें करून जा; परंतु पूर्वी कलहप्रिया इणें व्याघ्राची ग्रंथी पडली. त्या काळीं जसें भाषण करून निघून गेली, तसें तूं जाणत असलीस तर जा. या विषयीं कथा सांगतों श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी देवग्रामीं सिंह नामें पाटील राहात होता त्याची स्त्री कलहप्रिया, तिणें एके समयीं पती बरोबर कलह करून

दोघे पुत्र घेऊन आपले बापाचे घरीं चालली. मार्गी जात असतां एका अरण्यांत व्याघ्र पाहिला, तो त्या तिघांस पाहून आनंद पावला. व पुच्छ भूमीवर आपटूं लागला. त्या वेळीं धांवत्ये समयीं कलहप्रियेनें आपले पुत्रांस घेऊन प्राण संकटीं ह्मणाली कीं, अरे मूर्ख हो, तुह्मी पृथक् पृथक् व्याघ्र भक्षावयास कलह किमर्थ करितां ? प्रस्तुत एक व्याघ्र आला आहे, त्याचा विभाग अर्द्धा अर्धा भक्षावा, मग दुसरा हि सांपडेल. इतकें ऐकून व्याघ्रानें विच्यार केला कीं, ही व्याघ्रमारी आहे, पुढे मी गेलों तरी पुत्रांकडून मजला मारवील. तस्मात् पळूनच जावें, हें उत्तम असें ध्यानांत आणून मोठ्या वेगें करून पळता जाहाला. ही कथा ऐकून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ४३

व्रजदेविसयुक्तंतेगमनंगजगामिनि ॥ यथाप्रसंगतेबुद्धिर्व्याघ्रमार्याययथास्तिचेत् ॥१॥

अर्थ – हे प्रभावती ! तुजला जाराकडे जाणें फार योग्य आहे परंतु पूर्वी व्याघ्रमारी इजला जशी बुद्धी होती तसी तुजला असेल तर जा. या विषयीं कथा सांगतों श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, तो व्याघ्र पळून जात असतां, मार्गांत जंबूक भेटला त्याणें

विच्यारिलें कीं, अरे पळतोस कां ? तेव्हां व्याघ्र ह्मणाला. अरे मूर्खा विच्यारतोस काय ? अरण्यांत व्याघ्रमारी आली आहे, हें ऐकून जंबूक बोलिला कीं, ती मजला दाखीव, मनुष्या पासून तूं भय पावलास हें तुला योग्य नव्हे, मग तो जंबूक व्याघ्रास घेऊन त्या कलहप्रिये जवळ आला; तेव्हां तिणें पाहिलें, तों जंबुकानें व्याघ्रास आणिलें; मग कल्पना करून जंबुकास ह्मणाली. कीं, अरे धूर्त्ता ! तुजकडे तीन व्याघ्र येणें, त्यांतून एक देऊन मजला समजावितोस, परंतु मी ऐकणार नाहीं; असें एकतांच व्याघ्र पळून चालिला. जाते समयीं जंबूक जवळ होता तो आपटून त्याचे मुखांतून रक्त वाहूं लागलें. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाह्याली.

## कथा ४४

गच्छदेविनतेविघ्नंकर्त्तुंयोग्योस्मिभामिनि॥
संकटेसमनुप्राप्तेजंबूकस्येवचेन्मतिः॥१॥

अर्थ – हे प्रभावती ! तूं जा. मी तुला विघ्न करावयास योग्य नाहीं परंतु संकट काल प्राप्त झाला असतां त्याचें निवारण करून निघोन जा; या विषयीं जसी जंबुकाची बुद्धी होती तसी तुजला असेल तर जा. या विषयीं कथा सांगतों श्रवण कर.

दुसरे दिवसी प्रभावत्ती प्रत शुक बोलत आहे कीं, जंबूक व्याघ्रानें कंठाचे ठाई धरिला होता, तो घाबरा होऊन, प्राण संकट जाहालें तथापि कसेंही करून, प्राण रक्षावा यास्तव, व्याघ्र दूर जाऊन उभा राहावयाचे समयीं जंबुकानें हास्य केलें. तेव्हां व्याघ्रानें विच्यारिलें कीं, किमर्थ हंसतोस? नंतर जंबूक ह्मणाला कीं, व्याघ्रमारी मोठी धूर्त्त आहे, हें मजला समजलें. तिणें मजला भक्षावयाचें योजिलें होतें, परंतु तुझे प्रसादें करून प्राण वाचले. नाहीं तर आज मरण आलें होतें, व्याघ्रमारी पाठीस लागून येत्ये असें चित्तांत आणून हंसलों. हें व्याघ्रानें श्रवण करून संतोषानें जंबूक सोडिला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ४५

समयोयंसुखंभोक्तुंतवभामिनिसुंदरि॥ न यालंवेत्सिचेत्कर्त्तुंविष्णुशर्माद्विजोयथा॥१॥

अर्थ- हे प्रभावती! हा तुझा काळ सुख भोगावयाचा आहे तर भोगार्थ जा; परंतु पूर्वी विष्णुशर्मा ब्राह्मण होता त्याणें जसें कृत्य केलें तसें करावयास समर्थ अससील तर जा. एतद्विषयीं कथा सांगतों श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी

विशाल नगरीचे ठाईं अरिंदम राजा राज्य करीत असतां, तेथें विष्णुशर्मा ब्राह्मण विषयासक्त आणि स्त्री रहीत आणि व्यभिच्यारिणीस परम दुःसह राहात होता त्याचा पराजय करावयास वेश्येस सामर्थ्य नाहीं. मग इतर स्त्रि यांची कथा काय? असें असतां विच्यारीत विच्यारीत प्रिया वेश्या तेथें राहात होती तिणें त्या ब्राह्मणाजवळ सोळा मो होरा आहेत असें ऐकून, त्यास आपले घरीं बोलाऊन नेला आणि प्रतिज्ञा केली कीं, आज संपूर्ण रात्री मध्यें माझा प राजय झाला तर माझें द्रव्य आहे याचा चतुर्थांश तुजला दे ईन, नाहीं तर तुझ्या मोहोरा घेऊन तुजला सेवक करीन प्रा तःकाळ ह्मणजे कुक्कुट शब्द करितो तो शब्द जाहाला ह्म णजे तुझा पराजय झाला. असा निश्चय करून, नंतर तांबू ल देणें व गोष्टींत दोन प्रहर रात्र गेली. तेव्हां वेश्येनें सखी समीप येऊन तिजला सांगीतलें कीं, मध्य रात्री नंतर पिंपळा चे वृक्षावर जाऊन कुक्कुटा सारिखा शब्द करावा. ह्मणजे मी प्रातःकाळ झाला ह्मणोन ब्राह्मणास बाहेर घालवीन; असा निश्चय केला. नंतर कुंटिणीनें पिंपळाचे वृक्षावर च ढून कुक्कुटा सारिखा शब्द केला. तों, इकडे संयोगा नंतर दोन घटिकानीं वेश्येनें प्रातःकाळ झाला असें ह्मणून ब्रा ह्मणाचा धिःकार करून बाहेर घालविला. ब्राह्मण बाहेर

येऊन पाहातो तों कुंटीण झाडावर बसून शब्द करित्ये असें पाहू न दगड मारून तिजला खालीं पाडिली, आणि प्रातःकाळ होतांच राजास सांगून वेश्ये पासून चतुर्थांश द्रव्य घेता जा हाला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहली.

## कथा ४६

यथेच्छं व्रज भद्रे वै यदि वेत्सि त्वमुत्तरम्॥ यथा कारागरानाथः कृतवान्भूतनिग्रहे॥१॥

अर्थ - हे प्रभावती! तूं स्वइच्छें करून गमन कर. परंतु पूर्वीं कारागरेचा पती शांतधर्म नामें होता त्याणें भूताचे निग्रहा विषयीं जसें कृत्य केलें तसें तुझे ठाईं चातुर्य असेल तर जा. एतद्विषयीं कथा सांगतों श्रवणकर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी वत्स नगराचे ठाईं, शांतधर्म दरिद्री ब्राह्मण राहात होता. त्याची स्त्री, कारागरा कर्कशा, सर्व लोकांस कलह करून संताप करणारी अशी होती. त्या ब्राह्मणाचे घरीं महाक्रूर ब्रह्मराक्षस राहात होता. तो कारागरेचे भयानें अरण्यांत पळून गेला. इकडे ब्राह्मण एके समयीं स्त्रीचे संतापें करून घराहून निघून चालिला तो अरण्यांत गेला. तेथे ब्रह्मराक्षसाची भेट जाहली. नंतर माझे घरीं आज अतिथी व्हावें असें ब्रह्मराक्षसानें सांगीतलें, तेव्हां ब्राह्मण ह्मणाला कीं,

मी कारागरेचे संतापें करून बाहेर निघालों आहें, त्यास मा रावयाचें असल्यास सत्वर मारावें. मग ब्रह्मराक्षस बोलिला कीं, तूं मजपासून काडी मात्र भय न धरावें. मी तुझे घरीं राहात होतों परंतु कारागरेचे भयास्तव पळून आलों आहे. त्यास मृगवती नगरीचे ठाईं मदन राजा त्याची कन्या मृगलोचना आहे तिजला मी जाऊन उपद्रव करितों. ती तुज वांचून बरी होणार नाहीं. याज करितां तूं तेथें जाऊन राज कन्या व राज्याचा चतुर्थांश मागावा, आणि त्या राजानें कबूल केल्या नंतर उगीच विभूती तिजवर टाक ह्मणजे मी जाईन. या युक्तीनें तुजला एकवेळ बहुत द्रव्य देईन. मग तूं आपले घरीं जावें. असें बोलून त्या ब्रह्मराक्षसानें, पराळास देऊन आपण राज कन्येस उपद्रव करूं लागला. तेव्हां राजानें नगरांत दौंडी पिटविली कीं, कन्येस जो निरुपद्रव करील त्यास कन्या व राज्याचा चतुर्थांश देईन. त्या समयांत ब्राह्मण नगरांत गेला, आणि बोलिला कीं, मी उपाय करितो; असें बोलून राज कन्ये समीप गेला आणि काहीं मंत्र ह्मणून विभूत लाविली तों तत्क्षणींच राज कन्या स्वस्थ जाहाली. मग ब्राह्मणास चतुर्थांश राज्य व कन्या हीं दोन्हीं मदनराजा याणें दिल्हीं. तीं घेऊन ब्राह्मण संतुष्ट जाहाला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

# कथा ४७

गच्छदेविपरंवेत्सियदिकर्तुंत्वमुत्तरम्॥य
था कारागरानाथः कृतवान् भूतसंकटे॥१॥

अर्थ. हे प्रभावती! ज्या प्रकारें कारागरेच्या पतीनें भूताचें संकट प्राप्त झालें असतां, जसें भाषण करून संकट निवारण केलें तसें, तूं परपुरुष संगार्थ गेलीस तर भाषण करावयास जाणत असलीस तर जा; एतद्विषयीं कथा सांगतों श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, तो कारागरापती शांत नामा ब्राह्मण राजकन्या घेऊन स्वस्थ राहात असे. असें असतां पुनः ब्रह्मराक्षसानें येऊन राजपत्नी सुलोचना तिला उपद्रव केला. तेव्हां राजानें शत्रुघ्नास सांगून पाठविलें, त्याणें आपले राज्यांत मंत्रिकाचा शोध काढून केशव नामा भूतवैद्य समागमें घेऊन आपण येता जाहला. नंतर केशव शर्मा राजपत्नी समीप जाऊन बसला, तों ब्रह्मराक्षसानें मोठा शब्द करून केशवास भयें करून पळविलें, आणि ब्रह्मराक्षसानें कारागरेच्या पतीस गुप्तरूपें जाऊन सांगीतलें कीं, एक वेळ मी तुझें ऐकिलें. आतां तूं आपले राज्याचा उपभोग करून स्वस्थ राहावें. माझे वाटेस गेलास तर मी ऐकणार नाहीं, असें सांगीतलें. नंतर इकडे केशवशर्मा पळून गेला असतां राजानें कारागरापतीची प्रार्थना केली

कीं, आपण स्त्रीचें रक्षण करावें, तेव्हां तो बोलिला कीं, मी वारंवार उपद्रव कोठवर सोसावा ! परंतु या समयीं उपाय करून पाहातों, पुनः करणार नाहीं. नंतर अवघ्यानीं अवश्य ह्मणून, कारागरापतीस राज गृहीं आणिला. तेव्हा कारागरापतीनें विच्चार करून, ब्रह्मराक्षस राजपत्नीचे आंगीं होता यास्तव तिच्या कानांत सांगीतले कीं, अरे ब्रह्मराक्षसा ! माझी स्त्री कारागरा, तुझा व माझा शोध करीत येथें माझे घरीं आली आहे. ती येथें येणार. इतकें ब्रह्मराक्षसानें ऐकून शीघ्र राज पत्नी सोडून, पलायन करिता झाला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ४८

संभोगमाप्नुहिस्फूरत्वंजारेणसह भामिनि ॥
विषमेनिर्णयंकर्त्तुंवेत्सिचेत्संकटारिवत् ॥ १ ॥

अर्थ- हे प्रभावती ! तूं जारासह वर्त्तमान उत्तम भोग भोगावे परंतु; पूर्वीं संकटारीनें विषम काळ प्राप्त जाहला असतां ज्या प्रमाणें न्याय केला तसा संकट काळ तुला प्राप्त जाहाला असतां त्याचें निवारण करावयास जाणत अससील तर जा. एतद्विषयीं कथा सांगतों श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी राजा नंद सार्व भौम राज्य करीत असे. त्याचा प्रधान संक

टारी, राजाचे प्रतापें करून समस्त राजे पादाक्रांत होऊन राज्य निर्वेध जाहालें; असें असतां एके समयीं राजाचे चित्तांत आलें कीं; पृथ्वी निर्द्रव्य होऊन सर्व द्रव्य आपले जवळ येई असें करावें असा विच्यार करून कातड्याचे रुपये चालवूं लागला. ते समयीं प्रधानानें निषेध केला; यास्तव सेवकांस आज्ञा केली कीं, या प्रधानास नेऊन मारावें मग सेवकांनीं अवश्य ह्मणोन प्रधानास नेऊन उदक रहित एक माड खोल पाहून तेथें ठेविला. त्यास नित्य अन्न उदक मात्र पोचवीत असत. इकडे प्रधान मरण पावला, ही हाक जाहली. असें शत्रुनीं ऐकिलें. मग बंगाल देशाचे राजानें प्रधान मेला किंवा आहे हें समजण्याकरितां दोन घोड्या एक सारिख्या व अलंकार सारखे घालून परीक्षार्थ पाठविल्या. कीं, यांत आई व कन्या याचा निर्णय करून पाठवाव्या. नंतर राजानंद याणें शालिहोत्र जाणते आणून परीक्षा केली, परंतु समजलें नाहीं. तेव्हां राजा खिन्न होऊन बसला आणि बोलिला कीं, या समयीं संकटारि प्रधान असता तर याची परीक्षा करिता. मग राजानें सेवकास सांगितलें कीं, त्या आडांत जाऊन पाहावें. आणि संकटारी जीवंत असल्यास मजला सांगावें, मी तेथें येईन. तेव्हां सेवक ह्मणाला कीं, महाराज! त्या विहिरींत एक

पुरुष आहे परंतु बाहेर येत नाहीं, आपण तेथे गेल्यास सम जेल. नंतर राजा तेथे आपण जाऊन माणसें आडांत घालून संकटारीस काढिलें; आणि राजानें बोळखून संतोषें करून भेटला. आणि बहुत सन्मान केला. मग हें वर्तमान प्रधाना स सांगितलें. त्याणें ध्यानात आणून दोन्ही घोड्यांवर बार गीर बसवून फिरविल्या. नंतर जीन काढिलें. आणि मोक ळ्या सोडिल्या ते समयीं कन्या मातेजवळ येऊन बाळचेष्टा करूं लागली. नंतर माता जिव्हें करून कन्येस चाटूं लाग ली. मग कन्या व माता यांचा निर्णय करून पाठविल्या नंत र संकटारी जीवंत आहे, असा निश्चय करून बंगालचा रा जा स्वस्थ राहिला. नंतर इकडे राजा, संकटारी याचे विच्यारें वर्तूं लागला आणि पृथ्वी निर्द्रव्य करावयाची वासना टाकिली. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ४९

कर्त्तुं संभोगमेणाक्षि व्रजते यत्र रोचते॥ विष
मेत्वं प्रवीणासि पुनश्चेत्संकटारिवत्॥ १॥

अर्थ–हे प्रभावती! तुझें मन ज्या पुरुषाचे ठाईं रमत असे ल त्या पुरुषाकडे भोग करावयास जा. परंतु पूर्वी संकटारी संकट काळीं न्याय करण्या विषयीं जसें जाणत होता, तसें तूं जें कृत्य करिशील त्याचें आच्छादन करावयास जाणत अ

ससील तरजा. एतद्विषयीं कथा सांगतों श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी संकटारी प्रधान मरण पावला हें वर्त्तमान होतें. तेच समयीं मगधपुरचे राजानें एक काठी रत्न खचीत करून नंदराजाकडे पाठविली कीं, इचा मूळभाग व अग्रभाग याचा निर्णय करून पाठवावा; मग संकटारीनें पाहून सर्वांस दाखविली. परंतु कोणास समजेना, तेव्हां आपण विच्यार केला. आणि ती काठी घेऊन तिचे मध्यभागीं एक लहान पाषाण बांधून उदकांत सोडिली, तेव्हां अग्र भाग हलका यास्तव वर राहिला आणि मूळभाग जडत्वास्तव खालीं गेला. त्या वरून त्या काठीचे मूळाचा व अग्राचा निश्चय करून, मगधपुरचे राजास लिहून पाठविलें त्या दिवसा पासून सर्व राजे पूर्ववत् करभार देऊं लागले. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ५०

गच्छदेविनतेदोषोगमनेकोपिवर्त्तते॥ विषमेयदिवेत्सित्वंधर्मबुद्धिरिवेप्सितम्॥ १॥

हे प्रभावती! तूं जा; गेलीस तर तुझे जाण्यास काय दोष आहे? परंतु विषम काळ प्राप्त जाहला असतां धर्म बुद्धी सारिखें आपलें हित करावयास जाणत असलीस तर जा; एतद्विषयीं कथा सांगतों श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी मं गळ ग्रामाचे ठाईं धर्मबुद्धी व कुबुद्धी असे दोघे पुत्र राहात हो ते. ते एके समयीं देशांतरास जाऊन बहुत द्रव्य संपादिते जाह ले; तें घेऊन येतां मार्गांत एक अश्वत्थ होता त्याचे खालीं बसू न दोन विभाग केले; आणि तेथेंच भूमींत पुरून ठेऊन आप ण घरीं गेले नंतर कुबुद्धीनें रात्रौ जाऊन तें सर्व द्रव्य आणून ठेविलें; मग च्यार दिवसा नंतर सुबुद्धीस ह्मणाला कीं, आप लालें द्रव्य आणावें आणि उपभोग करावा. तेव्हां सुबुद्धीनें हो य ह्मणून अश्वत्था खालीं जाऊन पाहिलें तों खांचा मात्र आ हेत द्रव्य नाहीं. तेव्हा कुबुद्धी मोठ्यानें शब्द करिता जाहला. मग धर्मबुद्धीस कुबुद्धीचें सर्व कृत्य समजलें तेव्हां तो प्रधा नास निवेदिता झाला. मग प्रधानानें कुबुद्धीस आणून वि चारिलें कीं, द्रव्य काय जाहलें? तेव्हां कुबुद्धी ह्मणाला कीं, दोघांचें द्रव्य दोघांस ठाऊक असतां, तें नाहीं सारिखें जाहलें. यास साक्ष अश्वत्थ वृक्ष आहे त्यास विचारावें. ह्मणजे तो, द्रव्य कोणी नेलें तें सांगेल. मग सर्वांनीं ही गोष्ट मान्य करून उभयतांस तेथें घेऊन गेले, तों कुबुद्धीनें आपला पिता अगोदर चढेऊन अश्वत्थाचे ढोलींत ठेविला होता. नंतर कुबुद्धीनें अश्व त्थ पूजा करून हात जोडून ह्मणाला कीं, जर मी द्रव्य नेलें अ सेल तर काहीं न बोलावें, आणि धर्मबुद्धीनें नेलें असेल तर

नाव घ्यावें. मग पित्यानें उत्तर केलें कीं, धर्मबुद्धीनें द्रव्य नेलें. तेव्हां सर्वांस खरें भासलें. नंतर धर्मबुद्धीनें कुबुद्धीच्या पित्याचा शब्द ओळखून अश्वत्था भोवतें गवत लाऊन त्यास अग्नी लावितांच पिता उडी टाकून बाहेर आला. तेसमयीं सर्वांनीं पाहून कुबुद्धीस धिःकार करून शासन केलें. व द्रव्य धर्मबुद्धीस देवविलें. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ५१

याहिदेविरतिस्वादलुब्धेकामिनिसत्वरम्॥
गांगलीवविजानासिविषमेयदिभाषितुम्॥१॥

अर्थ- हे प्रभावती! तूं भोगा विषयीं फार आतुर झालीस तर सत्वर जा परंतु विपरीत काळ प्राप्त जाहाला असतां, गांगली ब्राह्मणा सारिखें भाषण करावयास जाणत असलीस तर जा; या विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

दुसरे दिवशीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वीं चस्माकर नगरीचे ठाईं चतुर्वेदी ब्राह्मण शिष्ट राहात होता, तो एके दिवसीं, आपले रथावर बसून यात्रेस निघून जात होता, तों मार्गीं अकस्मात चोर आले, ते समयीं रथ घेऊन बरोबरचे सर्व लोक पळून गेले. गांगली ब्राह्मण बंधू सहित पायानीं चालत होता, त्यास पळवेना. तेव्हां उभा राहून बंधूस ह्मणाला कीं, माझें धनुष्य, बाण, दे व चोर किती

आहेत तें सांग. आणि लोकांस उगीच हाका मारिता जाहला. तेव्हां पाठी मागून लोक बहुत येतात. असें, चोर समजून लो कांचे भयें करून पळून गेले. मग गांगली ब्राह्मण यात्रेस जा ता झाला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहली.

## कथा ५२

व्रजश्रेष्ठं नरं देवि यं त्वं कामयसे यदि ॥ जय
श्रीरिव जानासि कर्तुं परमसंकटे ॥ १ ॥

अर्थ-हे प्रभावती! तूं कामोत्सुक झालीस तर भोगार्थ जा राकडे जा, परंतु पूर्वी संकट प्राप्त झालें असतां, जयश्रीनें ज सें निवारण केलें तसें तूं निवारण करण्या विषयीं जाणत अ सलीस तर जा. त्या विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी प्रतिष्ठा नगरीचे ठाईं सप्तशाल राजा, त्याचा पुत्र, चातुर्य ना मा, त्याणें निश्चय केला कीं, वडिलांचे उपार्जित द्रव्यें करून शरीर पोषण न करावें. नंतर शांतिनिष्ठ ब्राह्मण, व सुतार, व वाणी यांचे पुत्र हे तीन मैत्र करून देशांतरास निघाला. नंतर सर्वांनीं एकत्र मिळून ध्यानांत आणिलें कीं, आह्मां स आर्जव करावयास एक समुद्र आहे, याचें आर्जव करावें या अर्थी श्लोक.

मेदिनीवसनीभूते बध्नातीव पयोनिधौ ॥

रत्नान्यर्पयितुंतानिपुरःसकुरुतेभुजान् ॥२॥

या विच्यारें समुद्र तीरीं गेले. तेथें एकवीस उपोषणें केली. नंतर समुद्र प्रसन्न होऊन, चौघांस चिंतामणी रत्नें देता झा ला तीं घेऊन तिघानीं वाण्याच्या पुत्राजवळ ठेवावयास दि ल्हीं. त्याणें एके दिवशीं च्यारी रत्नें आपली मांडी चिरून आंत ठेविलीं आणि मांडीस टांचे देता जाहला. पुढें एके दि वसीं मजलीस जातांच हाक मारिली, आणि ह्मणाला कीं, आपण मागील मजलीस रात्रौ निजलेले होतों, तेथें रत्नें विसरलों, हें ऐकून सर्वांनी निश्चय केला कीं, हा वाणी धूर्त्त आहे, याणें कपट केलें. असा निश्चय करून, ऐरावती नग रास गेले; तेथें नित्यशालि राजा, त्याचा प्रधान बुद्धिसागर, जग विख्यात. तेथें जाऊन रत्नांचा वृत्तांत सांगून ह्मणाले कीं, आह्मास भय व बंधन न करितां आमचीं च्यारी रत्नें आह्मांत आहेत तीं घेऊन आह्मास द्यावीं. नंतर राजानें हो य ह्मणून बुद्धिसागर यास त्याचा निर्णय करावयास सां गीतला, तेव्हा हा विषय ध्यानांत येईना. मग सखेद होऊ न घरीं येऊन बसला. त्या समयांत त्याचे कन्येनें श्रीदेवी स जाऊन नमस्कार करिती जाहली. आणि पिता सखेद पाहून विच्यारिलें कीं, विषादाचें कारण काय तें सांगावें, मी निर्णय करीन असें ऐकून बुद्धि सागर ह्मणाला कीं, म

जला समजत नाहीं तें तुजला काय समजेल ? तथापि सांगतों असें बोलून त्या चौघांचा वृत्तांत सांगीतला. तेव्हां जयश्री ह्मणाली कीं, यांत कांहीं विशेष गूढ नाहीं, मी ज्या समयीं बलावूं पाठवीन त्या समयीं चौघांस मजकडे पाठवावें, ह्मणजे त्यांचीं रत्नें त्यांस देईन. या प्रमाणें सांगून स्वगृहास गेली मग रात्रीं चौघांस भोजनास बोलाविलें आणि त्यांचीं भोजनें जाहाल्या नंतर चौघांस ही निजावयास पृथक् पृथक् स्थानें दिल्हीं, आणि आपण शृंगार करून प्रथम राजपुत्रा जवळ गेली. आणि ह्मणाली कीं, तुज समीप आल्यें त्यास मजला लक्ष द्रव्य द्यावें आणि मज बरोबर क्रीडा करावी; नंतर राजपुत्र ह्मणाला, मजपासीं द्रव्य येथें नाहीं, घराहून आणून देईन. तेव्हां हा निर्धन आहे असें जाणून सुतार या जवळ गेली तेव्हां त्याजवळ ही द्रव्य नाहीं असें जाणून, तिसरा ब्राह्मण शांतिनिष्ठ तोही निर्धन पाहून, वाण्याच्या पुत्रा जवळ गेली. तो तिच्या स्वरूपास मोहित होऊन तिची लक्ष द्रव्याची प्रतिज्ञा ऐकून ह्मणाला कीं, हे स्वामिनी! मज पासून च्यारी रत्नें घेऊन मज बराबर क्रीडा करावी. असें बोलून मांडींतून रत्नें काढून तिजला देता जाहाला. इतक्यांत पूर्वीच्या संकेतावरून बुद्धिसागर याणें त्वरा करून बोलावूं पाठविलें; तेव्हां घाबरी होऊन शीघ्र बाहेर

समस्त चौघांस वांटून दिल्हीं. तेही चौघे कृत कृत्य जाहाले. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ५३

व्रजरंभोरु युक्तं ते गमनं विषमे सति ॥ उत्तरं वेत्सि कर्तुं चेच्चर्मकारकलत्रवत् ॥ १ ॥

अर्थ– हे प्रभावती ! तूं पर पुरुष संगार्थ जा; तुझें गमन फार चांगलें आहे, परंतु पूर्वी चर्मकाची स्त्री देविका इणें संकट प्राप्त जाहालें असें पाहून चातुर्यानें भाषण केलें, तसें चातुर्य तुझे ठाईं असेल तर जा. या विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी चर्मण्वती नदीचे तिरीं चर्मकर ग्रामाचे ठाईं होहा नामें चर्मक राहात होता, त्याची स्त्री देविका, परपुरुष लंपट असे. असें असतां एके दिवसीं होहा चर्मक चर्म विकावयास बाहेर गेला इकडे स्त्रीनें परपुरुष आणून त्याज बरोबर क्रीडा करूं लागली. इतक्यांत होहा घरीं येतो हें पाहून आपण बाहेर येऊन ह्मणाली कीं, स्वामी ! नदींतील पाणी आणावया करितां गेल्यें होत्यें, तेथें एक मोठें चर्म पडलें आहे, तें सत्वर आणावें, विलंब जाहाल्यास कोणी घेऊन जाईल. हें

श्रवण करून मूर्ख चांभार लोभास्तव नदीस गेला. इतक्यां त इणें जार बाहेर काढून दिल्हा. हो हा चांभार याणें चर्मनाहीं असें पाहून घरीं आला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ५९

कोदोषोगमनेदेवियदित्वंवेत्सिभाषितुम्॥
विषमेविष्णुनामेवराजद्वत्तेहिभस्मनि॥१॥

अर्थ-हे प्रभावती! तूं जा. तुझे जाण्यास काय दोष आहे? परंतु पूर्वी विष्णुशर्मा प्रधानपुत्र यास भस्माचें योगानें संकट प्राप्त जाहाले. त्या काळीं त्याणें चातुर्य युक्त भाषण करून जसें निवारण केलें तसें चातुर्य तुझे ठाईं असेल तर जा; या विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं. पूर्वी शक्रवती नगरीचे ठाईं सुशील राजा, व त्याचा प्रधानही सुशील, प्रधान पुत्र विष्णु, संधि विग्रहादिक राज्यनीती चे ठाईं चतुर, परंतु राजानें प्रधान पदापासून दूर केला होता; असें असतां एके दिवसीं सुशील याणें राजास निवेदिलें, महाराज! माझा पुत्र अति प्रवीण आहे त्यास कोठे तरी पाठवून परीक्षा पाहावी. मग राजा ह्मणाला कीं, यास दूर केला असतां वारंवार येऊन पुनःपुनः संधान

न राजानें एके करँड्यांत भस्म घालून विष्णुजवळ देऊन सांगीतलें कीं, प्रतापशंकर राजास हा पदार्थ नेऊन द्यावा. असें बोलून करँड्यावर राजमुद्रा करून स्वाधीन केला. त्याणें काय पदार्थ आहे हें न पाहातां घेऊन प्रतापशंकराचे नगरास गेला, नंतर सुमुहूर्त करून राजास नमस्कार पूर्वक करँडा दिल्हा. नंतर प्रतापशंकर याणें सांगीतलें कीं, बोलण्याचा पर्याय उद्ईक करावा. ह्मणून प्रधानपुत्रास निरोप दिल्हा. आणि रात्रौ एकांतीं करँडा उघडून पाहिला तों आंत भस्म मग अति कोपें करून प्रातःकाळ होतांच विष्णुशर्मा यास बोलावून विच्यारिलें कीं, तुमचे राजानें अमोलिक करँड्यांत भस्म घालून काय समजून पाठविलें? याचा अर्थ समजला पाहिजे. असें बोलून क्रोध मुद्रा दाखविली. नंतर विष्णुशर्मा याणें, आपला तेजो भंग करावा यास्तव हें कृत्य आपले प्रभूनें केलें. असें समजून ह्मणाला कीं, आमचे प्रभूनें अश्वमेध यज्ञ केला, त्यास अग्निकुंडांतील पवित्र, आणि अंगिकार केल्यास श्रेयस्कर, पातक परिहार करणार असा यज्ञनारायणाचा प्रसाद रूप हें भस्म असें जाणून आपल्या कुटुंबास वंदन करावयास्तव पाठविलें आहे. अन्यथा कोणी साधारण मनुष्य आणिता

गजाः संति हयाः संति विचित्राः संति संपदः ॥
सद्यः पापहरं राजन् दुर्लभं भस्म यज्ञजम् ॥२॥

तस्मात् वंदन करावें, असें ऐकतांच प्रतापशंकर उठून शिरसा वंदन करून भस्माचा अंगिकार केला. व सकळ कुटुंबास दिल्हें. नंतर विष्णुशर्मा यास बहुत अलंकार व द्रव्य देऊन पाठविला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहली.

## कथा ५५

गच्छ रंभोरु युक्तं ते गमनं गजगामिनि ॥ यदि वेत्स्युत्तरं कर्तुं श्रीधरो ब्राह्मणो यथा ॥१॥

अर्थ- हे प्रभावती! तूं जा. तुला जाणें फार योग्य आहे. परंतु पूर्वी आपलें हित करावें एतदर्थ श्रीधर ब्राह्मणानें जसें भाषण केलें, तसें तूं जाणत असलीस तर जा. एतद्विषयीं कथा सांगतोती श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी चर्मकूट ग्रामीं श्रीधर ब्राह्मण राहात होता, त्याणें चांभारापासून जोडा विकत घेतला. नंतर तो किंमत मागूं लागला, तेव्हां ब्राह्मण ह्मणूं लागला कीं, तुजला शके देईन, असें बोलतां बहुत दिवस गेले. मग एके दिवसीं चांभारानें हात धरिला; त्या समयांत ग्रामाधिपतीस पुत्र जाहाला. अ

... येऊन बाहेर आली, आणि ह्म णाला कीं, हा चांभार मजकडे येऊन पोटास कांहीं, दाणे द्या वे. असें नित्य बोलत असे त्याजवरून मी देत होतों ते घेत नाहीं; आतां कपटाची गोष्ट सांगतो. आणि मजला स्पर्श के ला त्यास कोणी धनी असल्यास त्याचा विच्यार करावा. अ सें बोलिल्या नंतर. ग्रामाधिकारी यांच्या सेवकानीं चांभा रास दगड मारून गांवाबाहेर घालविला. आणि ब्राह्मण घरास गेला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहली.

## कथा ५६

याहिदेविगतावेत्सियदिकर्तुंप्रभावति ॥ वि
षमेशांतिकोनामवणिकुपुत्रोयथाकरोत् ॥ १ ॥

अर्थ - हे प्रभावती! तूं गेलीस तर जा. परंतु शांतिनामा वाणी याणें आपलें द्रव्य रक्षण करावें एतदर्थ जसें कृत्य केलें तसें कृत्य करावया विषयीं तुझे ठाईं चातुर्य असेल तर जा. या विषयीं कथा सांगतो ती ऐक.

दुसरे दिवसीं प्रभावतीस शुक बोलत आहे कीं, पूर्वी आनंद ग्रामाचे ठाईं शांतिक वाणी राहात होता तो अतिकृपण, ग्रामांतरीं जाऊन द्रव्य संपादन करावें. असें असतां एके समयीं गांवांत राहून द्रव्य घेऊन येत असतानां एके वाटेनें चोर भेटले ते आपणास मारितील, या भयें करून समीप

ण हातांत एक कवडी घेऊन देवासमोर उभा राहिला आणि मोठ्यानें बोलिला; हे देवा! हें द्रव्य तुजला अर्पिलें आहे हें घ्यावें; असें बोलिला आणि हातांतील कवडी दाखवून, वारंवार प्रार्थना करूं लागला. त्या वेळीं चोरानीं द्रव्य देवाचें आहे असें ह्मणून नमस्कार करून गेले. नंतर वाणी याणें देवास कवडी देऊन घराजवळ गेला. हें पाहून देवही विस्मय पावला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ५७

याहि देवि यथेच्छं त्वं यदि जानासि भाषितुम्॥
पंडितो नृप आयाते चंद्ररेखां यथावदत्॥१॥

अर्थ–हे प्रभावती! तूं स्वइच्छेंकरून गमन कर. परंतु पूर्वीं शुभकर नामा पंडीत याणें राजा आला असें पाहून चंद्ररेखे प्रत जसें भाषण केलें तसें भाषण करावयास तूं जाणत असलीस तर जा. एतद्विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं. पूर्वीं अवंती नगरीचे ठाईं राजा विक्रम. त्याची स्त्री चंद्ररेखा शुभकर नामा पंडिता बरोबर व्यभिच्यार करीत असे. हें वर्त्तमान राजानें कर्णोपकर्णीं ऐकिलें. तेव्हां एके दिवसीं चंद्ररेखा शुभकराचे घरीं जाऊं लागली. तों राजा विक्रम याणें

इतक्यांत शफ़करानें विक्रम यास पाहून ह्मटलें कीं, स्त्रियांचें कपट अति भयंकर आहे, तूं राजपत्नी माझे घरीं यावयाचें काय प्रयोजन? हें श्रवण करून राजा संतुष्ट होऊन घरास गेला. चंद्ररेखाही घरी गेली. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ५८

याहिदेवियतोयानंरोचतेतत्वभामिनि॥ यदिकर्त्तुंविजानासियथायौवनगर्विता॥१॥

अर्थ. हे प्रभावती! तूं स्व इच्छें करून ज्या स्थळीं जावयाचें असेल त्या स्थळीं जावें; परंतु पूर्वीं यौवन गर्वितेनें जसें कृत्य केलें तसें कृत्या विषयीं चातुर्य तुझें  गाईं असेल तर जा. एतद्विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शफ़क बोलत आहे कीं, पूर्वीं कोणी एक स्त्री, परम सुंदर, व चतुर, आणि यौवन गर्वित होती. तिणे चित्तात विच्यार केला कीं, मी चतुर आहें, परंतु माझे चातुर्याचें सार्थक हेंच कीं, आपले भ्रताराचे समक्ष परपुरुषापासी समागम करावा. मग एके दिवसीं परपुरुषास सांगीतलें कीं, तूं आज रात्रौ शहरा जवळ चिंचेचा वृक्ष आहे, त्या खालीं जाऊन उताणें निजावें, नंतर त्याणें तसेंच

त्यास तुह्मी बाहेर सोबतीस यावें, नंतर तिचा पती धनुष्य बाण घेऊन उभा राहिला; आणि आपण विपरीत विलास करिती जाहली. आणि पतीस ह्मणाली कीं, तुह्मी मोठे शूर ह्मणवितां तर. चंद्रास बाण मारावे. मग त्या मूर्खानें चंद्राचें साधन केलें, नंतर पतीस ह्मणाली कीं, अरे मूर्खा! तुज देखतां मी व्यभिच्यार केला. तो तुजला समजला नाहीं, असो. तूं मूर्ख तस्मात् मी जाल्यें. असें बोलून पर पुरुष व आपण घोड्यावर बसून जाती जाहाली. आणि तिचा पती लज्जित होऊन घरांत आला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहली.

## कथा ५९

गच्छ चेद्यदि वेत्सि त्वं युक्तिसंशय आगते॥ सु-
धर्मनृपतेर्यद्वत्सभायां नृपदूतकः॥ १ ॥

अर्थ — हे प्रभावती! तूं पूर्वी सुधर्म राजाच्या सभेचे ठाई रूपवान् राजाचें दूतानें जसें चातुर्य केलें तसें तुझे ठाईं असून, लोकांस अथवा तुझे भ्रतारास तूं जारकर्म केल्याचा संशय प्राप्त जाहाला असतां त्याचा संशय जावा. एतदर्थ भाषण करावयास जाणत असलीस तर जा; या विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी

ते समयीं रूपवान् राजा याणें आपला वकील कांहीं कामा करितां सुधर्मी याजकडे पाठविला. तो तेथून राजदर्शनास निघाला. ही बातमी सुधर्म राजास नकळतां आपण विचित्र सभेस जाऊन बसला. आणि रूपवान् राजा याचा वकील यास सभेंत बोलाविला. तेथें उदक असतां भूमी दिसावी आणि भूमी असतां उदक दिसावें, या प्रमाणें चमत्कार होता. असें असतां हरिदत्त शर्मा वकील सभेस जाऊन अकस्मात् जळमय मार्ग पाहून जळ आहे कीं स्थळ आहे हें पाहावयास हातांतील आंगठी त्वरेनें टाकिली ती पाषाणावर पडून मोठा नाद जाहाला मग स्थळ आहे असा निश्चय करून निःशंक जाता जाहाला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ६०

गच्छदेवियतोगंतुंवांच्छसित्वंप्रभावति ॥
यदिकर्तुंविजानासियथातनुकयाकृतम् ॥१॥

अर्थ-हे प्रभावती! तुझे मनांत ज्या पुरुषाचे ठाईं जावयाची इच्छा असेल त्याजकडे जावें, परंतु पूर्वीं तनुकेनें परपुरुष भोगार्थ जसें कृत्य केलें तसें चातुर्य तुझे ठाईं असेल तर जा. एतद्विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

धान्यकूर ग्रामीं नागवाणी राहात होता, त्याची स्त्री तनुका व्याभिच्यारिणी, असें असतां. एके दिवसीं देवयात्रा करावया स्तव सखीजनास हवर्त्तमान निघाली. तों मार्गीं सुंदर पर पुरुष पाहून, त्यास कटाक्षें करून समीप बोलाविला. आणि सांगीतलें कीं, माझा पती अति निष्ठुर आहे. यास्तव, मासें बाहेर येणें घडत नाहीं. त्यास एके दिवशीं मी, पाणी आणिते समयीं विंचूनें दंश केला असें बोलेन ते समयीं तूं त्या वाटेनें येऊन मी विषवैद्य आहें असें बोल; असा त्या पुरुषाबरोबर संकेत केला नंतर त्याणें तसेंच कबूल केलें, मग तनुका यात्रेहून घरीं आली आणि दुसरे दिवसीं पाणि आणित्ये समयीं विंचूनें दंश केला ह्मणून रडूं लागली; तेव्हां तिचा पती धांवत येऊन पाहूं लागला तों, मूर्च्छा फार पाहिली. मग घाबरा होऊन विषवैद्य पाहूं लागला. त्या समयीं पूर्व संकेता प्रमाणें तो पुरुष येऊन ह्मणाला कीं, काही या विषयीं उपाय आहे. मग त्या वाण्यानें त्यास घरांत नेला; त्याणें जाऊन तनुकेचे बोटास कडु औषध लाविलें. आणि वाणी यास सांगीतलें कीं, सर्व विषांत मनुष्याचें विष कठीण यास्तव तनुकेचे बोटास दंश करणें, मग त्या वाण्यानें दांत बोटास लावितांच कडू लागलें; तें विष असें भय मानून

लास मांडिले, नंतर तो वाणी बाहेर गेला असतां वैद्य ह्मणून प्रति दिवसीं येऊन अकर्म करूं लागला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ६१

याहिदेविप्रियंभोक्तुंतथाकर्त्तुंप्रवेत्सिचेत्॥
धनिकस्यप्रियाभ्यांवैकुमारेणयथाकृतम्॥१॥

अर्थ- हे प्रभावती! तूं प्रिय पुरुषाप्रत भोगार्थ जा; परंतु पूर्वीं कुमार नामा राजपुत्र याणें धनिक नामा सावकार यांच्या स्त्रियां सहवर्त्तमान भोग करावा एतदर्थ जसें कृत्य केलें तसें चातुर्य तुझे ठाईं असेल तर जा; या विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वीं गंभीरनगरीचे ठाईं कुमार राजपुत्र, व्यभिच्यारिणी स्त्रीशीं लंपट होता. त्या नगरांत कोणी एक धनिक नामा सावकार राहात असे. त्याच्या दोन स्त्रिया परम सुंदर होत्या; तेव्हां त्याणें आपले स्त्रियांस व्यभिच्यार घडेल ह्मणून, नदीचे तीरीं गांवापासून दूर घर बांधून तेथें ठेविल्या. आणि आपण संरक्षणार्थ नेहेमी राहूं लागला. असें असतां एके दिवसीं स्त्रीचे पायास काँटा लागला, तेव्हां पतीस सांगी

ला. मग त्याणें न्हावी आणविला. आणि बाहेर बसला. ते व्हां स्त्रियानी सोन्याची वाटी घरातून आणून न्हावी यास दिल्ही. आणि सांगीतलें कीं; आह्मास पुरूषाचा समागम घडे, असें करावें. नंतर न्हावी याणें मान्य केलें. आणि कांटा काढून बाहेर गेला; नंतर हें सर्व वर्त्तमान राजपुत्रास सांगीतलें. त्याणें होय ह्मणून न्हावी यास सांगीतलें कीं, तूं माझे समागमें येऊन त्या सावकारास सांगावें कीं, ही माझी स्त्री आहे आणि मजला दूर देशीं जाणें आहे त्यास इचें रक्षण आपण करावें असें भाषण करून मजला सावकाराचे स्वाधीन कर. असें सांगून स्त्रीचा वेष घेऊन त्या गृहस्थाचे घरास न्हावी आपले बराबर घेऊन गेला. नंतर न्हावी याणें पूर्व संकेता प्रमाणें त्या गृहस्थास सांगीतलें कीं, ही माझी स्त्री आहे, आणि मी दूर देशीं जातों ह्मणून ईचें रक्षण दुसरे ठिकाणीं होणार नाहीं, यास्तव आपण कन्ये प्रमाणें इला रक्षावें असें सांगून राजपुत्र स्त्रियांचे स्वाधीन केला, आणि आपण निघून गेला. इकडे राजपुत्र तो गृहस्थ बाहेर गेल्यावर, स्त्री वेष सोडून स्त्रियांचा उपभोग करी, असें असतां, हा स्त्री वेषधारी पुरुष असेल असा त्या गृहस्थास संशय होऊन, स्त्रियांस ह्मणा

घांनीं नग्न होऊन नृत्य करावें. नंतर राज पुत्रानें स्त्रियां सारिखे केंश लाऊन अंग संगोपन करून स्त्रियां बरोबर नृत्य करिता जाहला. नंतर गृहस्थाची भ्रांती गेली. राजपुत्र ही स्वकार्य साधूं लागला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ६२

गच्छचेद्विषमेवेत्सिकर्त्तुंयदिकृशोदरि॥ कु
तंदेविकयायद्वत्सखीजनविमुक्तये॥ १॥

अर्थ—हे प्रभावती! तूं व्यभिच्यारार्थ जा; परंतु पूर्वी आपले सखीचा मित्र, त्याची मुक्तता करावी, एतदर्थ देविकेनें जसें कृत्य केलें तसें चातुर्य तुझे ठाईं असेल तर जा; एतद्विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी कुठदर ग्रामीं सोम राजा रहात होता. त्याची स्त्री मंडुका अति व्यभिच्यारिणी होती. तिज बराबर एक व्यभिच्यारी पुरुष संग करीत असे; त्याचा संकेत कीं, आंगणात रात्रौ येऊन घंटा वाजवावी, मग मंडुकेनें बाहेर यावें; असें असतां एके दिवसीं सोम राजा याणें घंटेचा शब्द ऐकिला आणि हातीं काठी घेऊन बाहेर आला, इतक्यांत मंडुकेची

ह्मणाली की, भावोजी ! बैल पश्चिमेकडे निघून गेला, उत्तरे कडे का धांवतां ? मग सोमराजा लाजून बैलाचे भ्रांतीनें पश्चिमेस गेला. इकडे परपुरुष निघून आपले घरी गेला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहली.

## कथा ६३

गच्छदेविन कर्तव्यो विलंबः सुखकर्मणि ॥
यदिजानासि कर्तुत्वं प्रसंगे हंसराजवत् ॥ १ ॥

अर्थ-हे प्रभावती ! तूं सुख कर्मविषयीं जा विलंब करूं नको; परंतु पूर्वी संकट समयीं राज हंसानें जसें चातुर्य केलें तसें तुझे ठाई असेल तर जा. एतद्विषयीं कथा सांगतो ती श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं; पूर्वी एका अरण्यांत, च्यारशें कोश लांब व च्यारशें कोश रुंद असा एक वृक्ष होता, तेथें हंसराज सह कुटुंब राहात होता. तों एके दिवसीं पापवर्द्धन पारधी याणें त्या वृक्षास जाळें घातलें, नंतर प्रातःकाळीं वृक्षावर चढून हंस काढून पाहिले तों सर्व मेले असें जाणून खालीं टाकूं लागला. तों पूर्वी हंसानें सर्वांस सांगीतलें होतें कीं, तुह्मी मेल्या सारिखें राहावें. आणि सर्वांस टाकिल्या नंतर एकदम सर्वांनी उडावें; मग पारधी याणें सर्व हंस मेले असें पाहून, एक एक हंस

जाळें जमा करावयास उतरणार इतक्यांत हंस उडून गेले तें पाहून पारधी विस्मित होऊन घरास गेला. ही कथा श्रवण करून प्रभावती स्वगृहींच शयन करिती जाहली.

### कथा ६४

अथचेद्यासिकामार्त्ताया ह्मिभीरुगतासति ॥
प्लवंगवत्स्वमात्मानंयदित्वंवेत्सिरक्षितुं ॥१॥

अर्थ- हे प्रभावती! तूं कामें करून फार पीडा पावत्येस तरीं व्यभिच्यारार्थ जा; परंतु पूर्वी आपलें संरक्षण करावें एतदर्थ वानर जसें जाणत होता तसें तूं जाणत असलीस तर जा. या विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी बहुत वानर समुद्र तीरीं राहात होते त्यांत वचनप्रिय ह्मणून एक वानर होता; त्याणें एके समयीं मकरा बरोबर स्नेह केला, नंतर एके दिवसीं मकरानें उंबराचीं फळें आपले स्त्री करितां वानरा जवळून मागून घेतलीं. तीं मकरीनें भक्षून ह्मणाली कीं, हीं मधुर फळें जो भक्षितो त्याचें काळीज अति मधुर असेल. तर तें मजला द्यावें, नाहीं तर मी मरण पावेन. असें स्त्रीचें भाषण ऐकून मकर बाहेर येऊन ह्मणाला कीं, तूं माझ्या बंधूहून अधिक स्नेही आहेस

घ्यावी ह्मणून तिजला बहुत उत्कंठा जाहाली आहे तर तूं माझे पाठीवर बसून घरीं चलावें; नंतर वानराने स्नेह भावास्तव मान्य करून सुसराचे पाठीवर बसून त्याच्या घरीं चालिला. तों एक कोश उदकांत गेल्यानंतर सुसर हांसून ह्मणाला कीं, भाई! माझी स्त्री गर्भिणी आहे, तिजला तुझें काळीज भक्षावें असा डोहळा होत आहे ह्मणून मी तुजला नेतों. हें वर्तमान कर्णद्वारें ऐकून ह्मणाला कीं, भाई! मजला पूर्वीं तूं सांगीतलेंस नाहीं. आह्मीं वनचरें व्याघ्रादिकांचें भयास्तव काळीज समीप ठेवीत नाहीं. दूर गुप्त ठेवितों त्यास तुला काळीज पाहिजे तर उंबराचे फळांचा स्राव नित्य त्याजवर पडतो ह्मणून उंबराचे ढोलींत ठेविलें आहे. तें अतिमधुर आहे; तें तुला पाहिजे तर त्या उंबराजवळ चल ह्मणजे तुला देईन; हें श्रवण करून मूर्ख सुसर सत्य मानून वानरास घेऊन बाहेर आला. नंतर वानर वृक्षावर चढून ह्मणाला कीं, अरे मूर्खा! आतां तूं आपले घरास जावें. काळीज दूर ठेऊन कोणी वांचत असतो कीं काय? असो या उप्पर स्नेह करावयाचा विच्यार समजला आहे. हें ऐकून सुसर स्त्रीस काळीज प्राप्त जाहालें नाहीं. आणि वानराचा स्नेहही गेला. येणें करून सखेद होऊन निराशें क

भावती शयन करिती जाहली.

## कथा ६५

याहिदेविसुखंभुंक्ष्वयदितेस्तिसहायकः॥
वितंकसदृशःकालेविषमेस्कमतिर्ननु॥ १॥

अर्थ - हे प्रभावती! तूं विलास सुखाचा भोग कर परंतु पूर्वी केशव शर्मा यास संकट प्राप्त झाले त्या काळीं त्याचा मित्र वितंक याणें सहाय होऊन संकट दूर केलें तसें साह्य करून संकट दूर करावयाचें चातुर्य तुझे सख्यांचे ठाईं असेल तर जा; एतद्विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी विद्यास्थान ग्रामीं केशव शर्मा राहात होता तो एके समयीं स्नानार्थ तटाकास गेला. तेथें वाणी याची परम सुंदर कन्या पाहून तिज बराबर संग करावा असें इच्छिता जाहाला-इतक्यांत तिणें घागर माझे मस्तकावर चढवावी ह्मणून सांगीतलें. त्यावरून केशवानें घागर चढविल्ये समयीं तिचें मुख चुंबन केलें. हें वर्त्तमान तिचे पतीनें पाहून, केशवास धरून राज गृहास नेऊं लागला. ते समयीं मार्गांत वितंक नामें केशवाचा मित्र, त्याणें येऊन कानांत सांगीतलें कीं, तूं राजगृहीं गेल्या नंतर मुख चुंबन करावयाची आ

राज द्वारीं नेऊन प्रधानानें विच्यारिलें कीं, तूं परस्त्री चुंबन केलेंस याचें कारण काय? तेव्हां केशवानें मित्रोपदेशा प्रमाणें केलें नंतर प्रधान ह्मणाला कीं, यास सोडून द्यावा. याचा अपराध नाहीं. स्वभाव याचा असाच आहे. ह्मणून सर्व लोकानीं निर्दोष करून सोडिला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहली.

## कथा ६६

कुरुजारंविशालाक्षितथाकेतुमलंयदि॥य
थावेजिकयाकूपेऽधःपतंत्याकृतंपुरा॥ १ ॥

अर्थ- हे प्रभावती! तूं ज्यार कर्म कर परंतु पूर्वीं वेजिकेनें ज्यार कर्म करून त्याची संपादणी कर्ण्यासाठीं जसें साहस कर्म कूपांत उडी घालून केलें. तसें ज्यार कर्मा पासून शुद्ध व्हावें असें चातुर्य तुझे ठाईं असेल तरजा. एतद्विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वीं कमळपूर नगरीं वाणी याची स्त्री वेजिका व्यभिच्यारिणी राहात असे ती एके समयीं पतीस स्नानास उष्णोदक देऊन सीतोदक आणावया करितां पाणवठ्यावर गेली. तेथें अकस्मात जार पुरुष पाहून त्याज बरोबर संग केला. इक

धांवजकरितां कूपांत उडी टाकिली आणि मी ठथानें हाक मा रिली कीं, मी कूपांत पडल्यें. मग ग्रामांतील समस्त लोकां नीं हाक ऐकून धावत तेथें गेले. आणि वर काढिली. मग वाणी ही जाऊन घरीं घेऊन आला. ही कथा श्रवण करू न प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ६७

गच्छदेविसुखंभोक्तुंविरहेणकृशाम्शम्॥
कालिकावद्यदावेत्सिसंकटेवक्तुमद्भुतम्॥१॥

अर्थ-हे प्रभावती! तूं विरहें करून अत्यंत कृश जा हलीस. तर रति सुखभोगार्थ जा. परंतु पूर्वी कालिकेनें सं कट काळ प्राप्त जाहला असें पाहून जसें चातुर्यानें भाषण केलें तसें चातुर्य युक्त भाषण करावयास जाणत असली स तर जा. एतद्विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक भाषण करितो कीं, पूर्वी सरळपुराचे ठाईं साधुशर्मा ब्राह्मण राहात असे, त्याची स्त्री कालिका व्यभिच्यारिणी होती, तेव्हां एके समयीं महा पर्व आले ते वेळेस साधू बाहेर गेला असतां आपण पर पुरुष आणून त्याज बरोबर क्रीडा करूं लागली, इतक्यांत पती बाहेरून आला तेव्हां आपण सत्वर बाहेर येऊन स

वर्षाचे बेजमीचे अन्न देतो ह्मणून ब्राह्मण बहुत गेले आहेत; तर तुह्मी ही जावें; हें ऐकून ब्राह्मण लोभास्तव गेला. इकडे कालिकेनें पर पुरुष बाहेर काढून दिल्हा. ब्राह्मण नदीस जाऊन सावकार नाही हें पाहून घरीं आला; नंतर स्त्री ह्मणाली कीं, आह्मांस लाभा विषयीं दैव नाहीं असें ह्मणून बहुत खेद करून उगीच राहिली. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहली.

## कथा ६८

व्रजभामिनियुक्तं वै गमनं पुरुषांतरे ॥ वेत्सि
चेत् संकटे वक्तुं यथा मदनमंजरी ॥ १ ॥

अर्थ. हे प्रभावती ! तुजला अन्य पुरुषाचे ठाईं गमन करणें योग्य आहे. परंतु मदन मंजरीनें संकट काळीं जसें भाषण केलें, तसें भाषण करावयाचें चातुर्य तुझे ठाईं असेल तर जा. एतद्विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

दुसरे दिवसीं प्रभावतीप्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वीं महेश्वर नगरींत विचक्षण ब्राह्मण राहात होता. त्याची स्त्री मदन मंजरी ती गांवचे जोश्या बराबर व्यभिचार करीत असे. तेव्हां एके दिवसीं मध्यरात्रीचे ठाईं पतीस निद्रा लागली असें पाहून जोशी याचे घरीं चालिली. तेव्हां

मंजरीनें पाहिलें· मग धैर्य करून जोशाचे घरीं जाऊन त्यास साष्टांग नमस्कार करून ह्मणाली कीं, स्वामी! आज पतीचे भयास्तव बाहेर निघावयास अवकाश नाही· परंतु आतां निद्रा लागली असें पाहून आल्यें त्यास पूर्व दिवसीं एक स्वप्न वाईट पाहिलें, त्याचें फळ सांगावें· नंतर जोशी युक्तीनें इचा पती बाहेर आला आहे असें ध्यानांत आणून ह्मणाला कीं, तुझे पतीस अपमृत्यू आला आहे· त्यास उदईक शंभर ब्राह्मणास भोजन घालावें· आणि पती कडून एक वृषभ दान करवावें ह्मणजे आरोग्य होईल; दुसऱ्या वेळेच्या स्वप्नाचें फळ कीं, तुजला पुत्र होईल; असें ऐकून तिचा पती, आपल्यास विघ्न आलें होतें, परंतु स्त्रीनें रक्षण केलें· असें जाणून संतोषें करून घरीं जाऊन निजला· मागाहून मदनमंजरी स्वकार्य साधून पूर्ववत् आपले घरीं जाऊन निद्रा करिती जाहाली· दुसरे दिवसीं जोशी याणें सांगितल्या प्रमाणें केलें, ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली·

## कथा ६९

गच्छ देवि न ते किंचिदंतरायं करोम्यहम् ॥
उलूकोवयदा वेत्सि पतिवंचनमद्भुतम् ॥ १ ॥

उलूकीनें आपले पतीचे ठाईं जसें कपट केलें. तसें कौशल्य तुझे ठाईं असेल तर जा. मी तुजला काही एक विघ्न करीत नाहीं. या विषयीं कथा सांगतों ती श्रवण कर.

दुसरे दिवशीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वीं नावर गावीं गोविंदा तेली रहात होता. त्याची स्त्री उलूकी व्यभिच्यारिणी, असें असतां एके दिवसीं पती बाहेर गेला; ते समयीं परपुरुष आणून त्याज बरोबर व्यभिच्यार करूं लागली. त्या समयांत गोविंदा बाहेरून येता जाहाला, ते व्हां उलूकी बाहेर येऊन ह्मणाली कीं, स्वामी! तिळांच्या गोण्या बाजारांत आल्या आहेत त्यास आपण ठवकर गेलां असतां बाजारा पेक्षां सवंग मिळतील. हें ऐकून गोविंदा त्वरेनें बाजारांत गेला. इकडे पर पुरुष कार्य संपादून जाता जाहाला. ही कथा श्रवण करून प्रभावती शयन करिती जाहाली.

## कथा ७०

गच्छदेवि मनोज्ञासि जारं रंतुं यदृच्छया ॥
पुलिंद इव चेद्वेत्सि परवंचन मुत्तमम् ॥ १ ॥

अर्थ–हे प्रभावती! तूं स्वइच्छें करून सुंदर पुरुषा प्रत भोगार्थ जा. परंतु पूर्वीं पुलिंद सोनारानें सुवर्णाचा

रावयाचें चातुर्य तुजला असेल तर जा· एतद्विषयीं कथा सां गतों ती श्रवण कर·

दुसरे दिवसीं प्रभावती प्रत शुक बोलत आहे कीं, पूर्वी मणिक पुराचे गांई कृष्ण शर्मा ब्राह्मण राहात होता; त्याची स्त्री रतिका व्यभिच्यारिणी, यास्तव कृष्णशर्मा रक्षण करी त असे·असें असतां· एके दिवसीं रतिकेनें परपुरुषा बरोब र संग करून त्याज पासून दोन शेर सोनें घेतलें· आणि त्या चे गोट करावे ह्मणून पुलिंद नामा सोनार याजपाशीं नेलें त्याणें हें सोनें ( रतिकेनें ) व्यभिच्यारानें मिळविलें यास्त व पतीस न कळतां आपण द्यावयास आली, असें समजून तिज पासून सोनें घेऊन आच्छादिलें, पुढें रतिका मागाव यास आली; तिजला ह्मणाला कीं, तुझा पती त्या दिवसींच तुझे पाशीं मागून घेऊन, सोने घेऊन गेला; मी देत नव्हतों, प रंतु कलहास प्रवर्त्तला कीं, माझी वस्तू मजला देत नाहीस त्याचें कारण काय ? तेव्हां मी सोनें दिल्हें· हे रतिकेनें ऐकू न व्यभिच्यारें करून मिळविलेलें सोनें; यास्तव चित्तांत शो क करीत उगीच राहिली· आणि सोनार आपणास लाभ झाला ह्मणून संतोष मानून स्वस्थ राहिला· हें चातुर्य तुज ला असेल तर परपुरुष समागम करावा असें शुका पासू

## कथा ७१

या प्रमाणें सत्तर दिवस गेल्यानंतर, प्रभावतीचा पती मदन, द्रव्य संपादन करून द्वीपांतराहून घरीं आला; नंतर विदग्धचूडामणी शुक, हा श्लोक ह्मणून मदनास विस्मय करिता जाहाला.

अनुरागोवृथास्त्रीणांभाषणंचवृथावृथा ॥
अप्रियामपिमन्यंतेप्रियांमूढजनाःखलु ॥१॥

अर्थ – स्त्रीचें चरित्र परम गहन आहे; यास्तव विश्वास न धरावा, हा अर्थ ध्यानांत आणून, मदन सक्रोध होऊन, शुकाकडे अवलोकन करिता जाहाला; नंतर प्रभावती आपल्या पतीस साष्टांग नमस्कार करून ह्मणाली कीं, कुश्चित् सखीजनाचे समागमें करून विपरीत बुद्धी जाहाली होती; परंतु विदग्धचूडामणीनें रक्षिलें; हे उपकार या देहीं विसरावयाचे नाहींत; हें ऐकून संतोष पावला. परंतु सखेद राहिला.

नंतर मदनाचा खेद जाऊन संतोष व्हावा ह्मणून विदग्धचूडामणी कथा सांगतो हे; पूर्वी मोठे पर्वताचे गांई मदन गंधर्व राहात होता, त्याची स्त्री रत्नावली, आणि कन्या रूपवती परम सुंदर, असें असतां एके दिवसीं, नारद गंधर्वाचे घरीं आला, त्याणें कन्येचें स्वरूप पाहिलें, आणि किंचित्

रूपवतीचे आचारा विषयीं विटंबना होईल; नंतर तिचा पिता मदन याणें प्रार्थना करून शापाचा मोक्ष मागीतला. तेव्हां मुनी ह्मणाला कीं, माझें वचन असत्य होणार नाहीं, इजला एकवेळ व्यभिच्यार घडेल, मग निर्दोष होईल. असें बोलून कनकप्रभ नामा गंधर्व यास देवविली; आणि नारदानें वरदान दिल्हें कीं, तुजला पुत्र होईल, इतकें सांगून नारद गेला. इकडे रूपवती योवनांत आली ते समयीं कोणी एका विद्याधरानें पाहून, तिचापती कनक प्रभ याचें स्वरूप घेऊन उपभोग करून गेला. नंतर कनक प्रभ याणें, स्त्रीस व्यभिच्यार घडला; हें वित्तांत आपून मारावयाकरितां देवीच्या देवालयांत घेऊन गेला; इतक्यांत. देवी प्रत्यक्ष येऊन ह्मणाली कीं, ही निर्दोष आहे. नारदाचे शापास्तव ही गोष्ट घडली, आणि तुझें स्वरूप घेऊन विद्याधर आला. तेव्हां इजला पुत्र होईल हाही वर आहे; यास्तव इचा अंगिकार करावा. असें देवीचें वाक्य ऐकून कनक प्रभ आपले स्त्रीस घेऊन घरास आला. ही कथा सांगून शुक ह्मणाला कीं, माझ्या वचनाचा तुजला विश्वास असला तर प्रभावती निर्दोष आहे. इचा अंगिकार करावा. नंतर शुकाचे वचनें करून मदनानें प्रभावतीचा अंगिकार केला. या

## कथा ७२

नंतर बाहात्तरावे दिवसीं आकाशांतून पुष्पमाळायुक्त विमान उतरलें, तें विमान पाहून, विदग्धचूडामणी शुक, व मालती नामें मैना हीं उभयतां शाप मुक्त होऊन दिव्यदेह धारण करून, विमानारूढ होतीं जाहलीं; त्या उभयतांस अवलोकन करून मदन दोन्ही कर जोडून प्रार्थना करून भाषण करिता जाहाला कीं, हे महाराज! आपण कोण आहांत? तें व हे देह कोणत्या कारणास्तव धारण केले होते हें सर्व वर्तमान मजला कृपा करून सांगीतलें पाहिजे, असें मदनाचें भाषण श्रवण करून नंतर गंधर्व बोलता जाहाला. हे मदना! पूर्व वृत्तांत सांगतों श्रवण कर. पूर्वी मालती मैना ही देवांगना, व मी गंधर्व असें असतां एके दिवसीं इंद्रानें गायना करितां दूत पाचारण पाठविले. त्या काळीं आह्मीं मधुपानाच्या योगानें उन्मत्त होऊन आज्ञा भंग केला; तेणें करून इंद्र सक्रोध होऊन शाप देता जाहाला कीं, आज पासून पक्षी यांचा देह धारण करून, मृत्युलोकीं वास कराल. तें श्रवण करून परम भयाभीत होऊन आपण शापमुक्त व्हावें एतदर्थ, इंद्रास शरण गेलों. आणि बहुत प्रार्थना केली, त्या काळीं इंद्र सदय होऊन उश्शाप देता जाहाला कीं,

तुह्मीं मदोन्मत्त जाहालां होतां, यास्तव कोणी पुरुष, अथवा स्त्री, यांस कामोद्भव होऊन व्यभिच्यारास प्रवृत्त होतील त्यांस व्यभिच्यारा पासून दूर करून सन्मार्गास लावाल तेव्हां, त्या पुण्याच्या योगानें, तुह्मांस पुनः स्वर्ग प्राप्त होईल; हें आपलें पूर्ववृत्त सांगून गंधर्व बोलत आहे कीं, हे मदना! हें आमचें चरित्र, कोणी लेखन अथवा पठण अथवा श्रवण करील त्यास चातुर्य व संपत्ती सहज प्राप्त होईल. असा वर देऊन गंधर्व व देवांगना हीं उभयतां स्वर्गास जातीं जाहालीं. आणि हरिदत्तानें आपला पुत्र मदन आला ह्मणून बहुत आनंदानें याचक जनास बहुत द्रव्य देऊन संतुष्ट केले. तदनंतर, मदन, प्रभावती सहवर्तमान सुखें करून सकळ संपत्तीचा उपभोग करीत होत्साता वास करिता जाहाला.

समाप्तम्.